# हरि नारायण आपटे

यांचें

# संक्षिप्त चरित्र.



किंमत १० आणे.

# हरि नारायण आपटे

यांचें

# संक्षिप्त चरित्र.


लेखक.

बापुजी मार्तंड आंबेकर



पुणें येथें

आर्यभूषण छापखान्यांत अनंत विनायक पटवर्धन

यांनी छापून प्रसिद्ध केलें



ता. ३ मार्च सन १९२२.

किंमत दहा आणे.



हें पुस्तक

प्रिय भगिनी रमावहिनी आपटे

( हरिभाऊच्या पत्नी )

यांस

त्यांच्या मजवरील बंधुप्रेमाबद्दल

आदरपूर्वक

अर्पण केलें आहे.

—पुस्तककर्ता.



# प्रस्तावना.

हरिभाऊंचे मी लिहिलेलें एक अल्प चरित्र मासिक मनोरंजनाच्या सन १९१९ मधील एप्रिलच्या अंकांत प्रसिद्ध झाले होते. त्यानंतर त्याच्या अनेक मित्रपरिचिताकडून माहिती मिळवून एक सविस्तर चरित्र प्रसिद्ध करावे असा विचार होता. त्याकरितां कांहीं प्रयत्नही केला; पण तो अल्पावधीत यशस्वी होणें तितके सोपे नाही असे वाटल्यावरून हल्लीचे हे संक्षिप्त चरित्र प्रसिद्ध करीत आहे. ज्यांचें चरित्र कोणत्या ना कोणत्या तरी रीतीने तरुण पिढीस बोधक व मार्गदर्शक होईल अशी आपल्या इकडे अनेक माणसें झाली. यांपैकी कोणाच नमुनेदार असे चरित्र प्रसिद्ध झाल्याचे उदाहरण सांपडलेच तर तें अपवादादाखलच सांपडेल. याचें मुख्य कारण म्हटलें म्हणजे तसें चरित्र लिहिण्यास अवश्य असलेल्या सामुग्रीचा अभाव हें होय. रोजच्या दिनचर्येत विशेष घडलेल्या गोष्टींची रोजनिशी ठेवण्याची पाश्चात्य देशांप्रमाणे आपल्या इकडे पद्धत नसल्यामुळें चरित्रास अत्यंत उपयोगी पडणारें असे एक मोठें साधन आपणास उपलब्ध होत नाही हरिभाऊ व त्याचे अनेक परिचित स्नेही याच्याजवळ अशा रोजनिशा असत्या तर त्यांचे एखादें मोठें चरित्र निर्माण होणें खाचित सुलभ झाले असते नुसत्या आठवणींवर मदार ठेवून एखाद्याचे चरित्र लिहूं म्हटल्यास ते केव्हांही सर्वांगपरिपूर्ण असे होणार नाही.

हरिभाऊंच्या ५५।५६ वर्षांच्या गजबजलेल्या हयातीत त्याचे निरनिराळ्या वेळी जे निरनिराळे स्नेही होते त्याजकडून त्या त्या वेळची कांहीं महत्वाची माहिती मिळाल्यास पहावें, या विचारानें मी कांही खटपट केली. हरिभाऊंच्या एखाद्या स्नेह्याची गाठ घेऊन "आपला हरिभाऊशी अमुक वेळी विशेष घरोबा होता तेव्हां त्या वेळची कांही विशेष माहिती द्याल का?" असा प्रश्न केल्याबरोबर त्या गृहस्थांनी मोठ्या प्रेमाने म्हणावें, "होय, आपण म्हणता त्याप्रमाणें हरिभाऊंचा आमचा फार निकट संबंध ! पुष्कळ माणसें पाहिली, पण हरिभाऊंसारखा माणुस मिळणें कठिण ! त्यांचें आमच्यावर काय प्रेम होते म्हणून सांगूं !" "त्यावेळेचे कांहीं मनोरंजक किंवा मनोवेधक असे प्रसंग सांगाल काय?"

असे विचारतांच " त्यांच्या आमच्या वेळच्या काय गमती सांगाव्या ! तो काळ आमच्या सर्व आयुष्यात मोठा मजेचा गेला ! " असें त्यानें उत्तर द्यावें. झालें, हरिभाऊंसंबंधाचा त्या गृहस्थांची माहिती अशाच प्रकारच्या दोन तीन वाक्यांत संपावयाची ! " काही विशेष गोष्टी सांगा " म्हटलें की " तशा गोष्टी कशा सांगतां येतील ! आम्ही काय टिपण थोडेंच करून ठेवले आहे ! पण एकंदरीनें मनुष्य मोठा बहारदार ! " असे उद्गार त्यांच्या तोंडून निघावयाचे. सारांश काय की रोजच्या दिनचर्येतील स्मरण ठेवण्यासारख्या गोष्टींचा संग्रह करून ठेवण्याची आपल्या इकडे वहिवाट नसल्यामुळें एका माणसासंबंधानें हजारो माणसाना माहिती विचारली तरी ती चार दोन कायम ठशाच्या वाक्यातच प्रायः मिळावयाची !

चरित्रास उपयोगी अशा माहितीचे दुसरें साधन म्हटलें म्हणजे पत्रव्यवहार हें होय. याही बाबतीत आपल्या इकडे असावी तशी स्थिति नसते. एक तर पत्र-व्यवहार ही संपादन करण्यालायक अशी एक कला आहे, ही आपल्या इकडे पुष्कळाना कल्पनाच नसते. ज्या थोड्याना ती असते त्याच्यात या साधनाचा पद्धतशीर उपयोग करणारे असे त्याहूनही थोडे; आणि यामध्ये पत्रव्यवहारातील महत्त्वाचे कागदपत्र नीट जतन करून ठेवणारे तर फारच विरळा ! आमच्या इकडे पत्रव्यवहार बहुधा कधी खुशालीपलीकडे जावयाचाच नाही. एखाद्यानें त्या पलीकडे तो नेऊन इतर कांही महत्वाच्या गोष्टींचा त्यांत समावेश केलाच तर " पत्रात हें हो काय यानें भारूड लिहिलें आहे, " असेंच जो तो म्हणणार व त्याकडे दुर्लक्ष्य करणार. वस्तुतः रोजनिशी व पत्रव्यवहार याचा अधिकार फार मोठा आहे. या दोन्ही साधनांची सिद्धता असल्यास एखाद्या सामान्य मनुष्याचें चरित्रही प्रसंगवशात् हृदयंगम असें करिता येईल. मग हरिभाऊंसारख्यांच्या चरित्राची गोष्टच बोलावयास नको. चरित्रलेखनासंबंधात आपल्या इकडे अशा अडचणी असल्यामुळें तें कार्य व्यवस्थित रीतीनें शेवटास नेणें किती कठिण असतें हें लक्ष्यांत येईल.

चरित्राची मिळावी तशी सामुग्री उपलब्ध होणें हें बरेच आयासाचें असून तसे आयास करून ती मिळविणें हें बरेंच कालावधीचेंही काम आहे. सुदैवानें हे सर्व योग जमून आले तर हरिभाऊंचें एक सविस्तर चरित्र प्रसिद्धही होईल.

पण तोंपर्यंत त्यांच्या आयुष्यक्रमाची साधारण रूपरेखा दर्शविणारें असें तरी निदान एखादें संक्षिप्त चरित्र वाचकांपुढें असावे याच उद्देशानें हें लहानसें पुस्तक लिहिलें आहे. हरिभाऊंच्या तिसऱ्या श्राद्धतिथीनिमित्त त्यांचे एक अल्प चरित्र प्रसिद्ध करावें अशी कांहीं मित्रांकडून सुमारें तीन चार आठवड्यांपूर्वी सूचना येताच मासिक मनोरंजनात प्रसिद्ध झालेल्या ज्या चरित्राचा आरंभीं निर्देश केला आहे, त्याचेंच पुनर्मुद्रण करावे असा पहिला विचार होता. पण पुस्तक छापून छापावयाचेंच तेव्हा त्यात आणखी काही माहिती घालता आल्यास ती घालावी असे साहाजिकच वाटले आणि त्याप्रमाणे तजवीज करून हें पुस्तक तयार केले.

एखाद्याच्या चरित्राची माहिती चरित्रनायकाचे आप्त व इष्टमित्र यांच्या आठवणीवरच आधारलेली असली म्हणजे त्यासंबंधात एक विशेष खबरदारी घेणे जरूर पडते. एखाद्या आठवणीत कोण्या व्यक्तीचा संबंध आला असला तर त्या आठवणींतील प्रसंगाबद्दल त्या व्यक्तीची मान्यता मिळेल किंवा नाही, याचा पूर्ण विचार करूनच तिचा समावेश पुस्तकात करावा लागतो. नाही तर ती आठवण लिहावी आणि त्या आठवणीतील प्रसंग मुळींच घडलेला नाही असे त्या व्यक्तीने म्हणावे! असा प्रसंग यावयाचा. विशेषतः एखाद्याचे चरित्र त्याच्या समकालीन पिढीतील कित्येक माणसें विद्यमान आहेत अशा स्थितीत लिहावयाचें म्हणजे तर असे प्रसंग टाळण्याबद्दल जितकी खबरदारी घ्यावी तितकी थोडीच होते. शिवाय ज्याचें चरित्र लिहावयाचें त्याचा मोठेपणा वाढविणाऱ्या पण त्याबरोबरच त्याचे आप्त किंवा इष्टमित्र याना कमीपणा आणणाऱ्या अशाही गोष्टी चरित्रातून होता होईतों वगळणें भाग पडते. आधीं माहितीचा पुरवठा बेताचाच आणि त्यांतही ही निरनिराळी पथ्यें पाळावयाची अशा स्थितींत चरित्र मनोवेधक व वाचनीय करणें हें अर्थातच विशेष कौशल्याचें काम आहे. तें कोणा अधिकारी माणसाच्या हातून होईल तेव्हा होवो! पण तें होईपर्यंत हरिभाऊ, त्यांचा लेखनव्यवसाय व त्या व्यवसायानें केलेलें समाजोपकारक कार्य यांची साधारण कल्पना तरी या लहानशा पुस्तकाच्या वाचनाने वाचकांच्या मनांत आली तरीही पुस्तकप्रसिद्धीचा उद्देश सिद्धीस गेला असें समजता येईल.

चरित्रलेखनासंबधाने साधारणतः अनिवार्य अशा अडचणी कोणत्या असतात हें वर थोडक्यांत सांगितलेच आहे. त्याबरोबरच चरित्रनायक हरिभाऊसारखा एखादा ग्रंथकार असला म्हणजे या बाबतींत सुगमता आणणारी अशीही एक गोष्ट असते तिचा निर्देश करणें जरूर आहे. हरिभाऊंनी आपल्या कादंबऱ्यात समाजांतील अनेक प्रवृत्तीच्या, स्वभावाच्या व मनोधारणाच्या माणसाचे शब्दचित्र रेखाटले आहे. यामध्य कित्येक ठिकाणी सहज किंवा बुद्धिपुरःसर त्याच्या हातून स्वतःच्या स्वभावाचेहि छायाचित्र उमटलेले दिसतें. विशेषतः त्याच्या निकट परिचित माणसास अशी स्थळे चटकन ओळखता येण्यासारखी आहेत. त्यांच्या चरित्रलेखनाचे कामी अशी स्थळें साहाजिकच उपयोगी पडण्यासारखी असतात. आणि प्रस्तुत पुस्तकात त्यांचा यथावकाश उपयोगही केलेला आहे. आपल्या कादंबऱ्यांत त्यानीं दिलेली कित्येक स्वभाववर्णनें व व्यक्त केलेले कित्येक विचार ही त्याच्या आयुष्यक्रमाचेंच प्रतिबिंब दर्शविणारी आहेत. त्यांचा भरपूर रीतीनें उपयोग केल्यास इतर रीतीनी मिळावयाच्या माहितीची उणीव बऱ्याच अशानीं भरून निघण्यासारखी आहे. हल्लीच्या संक्षिप्त चरित्रात त्याचा उपयोग अर्थातच संक्षिप्त रीतीनें होणें केवळ अपरिहार्य होते आणि तो तितक्याच प्रमाणात झाला आहे.

आपले आत्मचरित्र लिहावे असा हरिभाऊंचा फार मनोदय होता. आणि तो शेवटास गेला असता तर मराठी वाङ्मयात एका उत्कृष्ट ग्रंथाची निःसंशय भर पडली असती. पण ती गोष्ट होणें आता शक्य नाही. त्यांच्यासारख्या प्रतिसृष्टि निर्माण करणाऱ्या कादंबरीकाराच चरित्र लिहिणें हें काम तशाच अधिकाराच्या माणसाच्या हातून होणे अवश्य होतें. पण या जगांत "घडणें जरूर आहेत अशा गोष्टी " व "प्रत्यक्ष घडून येणाऱ्या गोष्टी" यांचा मेळ पडल्यास दुःखाचे किंवा निराशेचे कारणच रहाणार नाही ! हरिभाऊचा व माझा निकट संबंध त्याच्या आयुष्याच्या शेवटच्या बारा वर्षांतच होता. या काळांत त्यांच्या आयुष्यक्रमासंबंधानें त्यांच्या निकट सानिध्यानें माझ्या मनावर जो ठसा उमटला तेवढ्यापुरतेंच अधिकारपूर्वक रीतीनें बोलणें किंवा लिहिणें मला शक्य आहे. या पूर्वीच्या त्याच्या आयुष्यक्रमासंबंधानें जी माहिती या पुस्तकांत आली आहे त्यांपैकी बहुतेक भाग हरिभाऊंच्या त्या त्या काळच्या स्नेही मंडळीच्या

तोंडन ऐकलेला असाच आहे. या मंडळींपैकी कित्येकानी आणखी महत्त्वाची माहिती पुरविण्याचे आश्वासन दिलें असून तें त्यांच्या हातून पूर्ण केलें जाईल असा मला भरंवसा वाटतो. हा भरंवसा सार्थ ठरला तर हीही नवीन माहिती या पुस्तकाची द्वितीयावृत्ति निघण्याचा सुयोग आल्यास या आवृत्तीत किंवा स्वतंत्र रीतीने वाचकांपुढें मांडण्याचा मी अवश्य प्रयत्न करीन. प्रस्तुत पुस्तक तयार करण्याचे कामी ज्या गृहस्थानी मला मदत केली त्यांचा मी आभारी आहे. त्यात विशेषतः प्रो. ना. स. पानसे व रा. कृष्णाजी के० गोखले यांचा विशेष रीतीने निर्देश करणें जरूर आहे. त्याचप्रमाणे पुणें मराठी ग्रंथालयाचे व्यवस्थापक रा. आण्णा नारायण रावगी यांनी संग्रहांतील कित्येक पुस्तकांचा उपयोग करण्याचे कामीं वेळावेळीं मला साहाय्य केल्याबद्दल त्यांचाही मी आभारी आहे.

पुणें, ता. ३ मार्च
स. १९२२.

बा. मा. आंबेकर.

# अनुक्रमणिका.



जन्म–ता. ८।३।१८६४.] हरि नारायण आपटे. [मृत्यु–ता. ३।३।१९१९.

# ह. ना. आपटे यांचें संक्षिप्त चरित्र.

## प्रकरण पहिलें.

### हरिभाऊंचें बाळपण.

#### थोडी कुळकथा.

" आपटे घराण्याचा इतिहास " प्रसिद्ध झाला असल्यामुळें आतां हरिभाऊंची कुळकथा फारशी लिहिण्याचें कारणच नाही. एका कुळाच्या दहा पांच पिढ्या घेतल्या तर त्यांतील पुरुषांचा एकमेकांशी मेळ क्वचितच लागतो. ज्या कुळांत तरवारबहाद्दूर होतात त्याच कुळांत तरवारीचें नांव ऐकल्याबरोबर भिऊन पळून जाणारे वीर सांपडतात. वैदिक शास्त्री यांच्याबद्दल नामांकित असलेल्या कुळांत कित्येक वेदशास्त्रशून्य निपजलेले दिसतात. सारांश, अनेक पिढ्या एकच व्यवसाय व एकच परंपरा चालू असलेली कुळें निघालीच तर तीं अपवादादाखल निघतील. म्हणूनच कुळकथेच्या विशेष भानगडींत न पडतां हरिभाऊंच्या वडिलांपासून व चुलत्यापासूनच आपण आरंभ करूं. हरिभाऊंचे वडील नारायण चिमणाजी हे घरगुती अडचणीमुळें तरुणपणीच नोकरींत शिरले. पण ते एकधोरणी, हुषार व निश्चयी असल्यामुळें लवकरच चांगल्या हुद्देदारीच्या जागेवर चढले. हरिभाऊंचे चुलते महादेव चिमणाजी यांचें नांव नामांकित वकील म्हणून सुप्रसिद्धच आहे. शिवाय आनंदाश्रम ही नमुनेदार संस्था स्थापन करून त्यांनीं स्वतःच आपलें स्मारक करून ठेवलें आहे. महादेव चिमणाजी हे बी. ए. झाल्यावर त्यांनीं मुंबईसच एका शाळेमध्यें नोकरी धरली. पण शिक्षकाचें काम त्यांनीं कांहीं थोडीं वर्षेंच केलें. एलएल. बी.ची परीक्षा पास झाल्यानंतर त्यांनीं मुनसफीची नोकरी धरली, आणि अलीबाग येथें कांहीं दिवस मुनसफीचें काम केलें. पण त्यांच्यासारख्या हुषार व कर्तृत्ववान् माणसास नोकरीचें मेलेलें

अन्न न आवडणें स्वाभाविकच होतें. आणि त्याप्रमाणें त्यानीं नोकरी सोडून देऊन मुंबईस वकिलीचा धंदा सुरू केला. या धंद्यांत उत्तरोत्तर त्यांचा उत्कर्ष होऊन त्यांना चांगले पैसे मिळूं लागले.

महादेव चिमणाजी हे वकील झाले त्या वेळचा काळ मोठा धामधुमीचा होता. देशोन्नतीकरितां सुरू झालेल्या अनेक धडपडी व मतांतराच्या उसळलेल्या लाटा यानी अगदीं नादान लोकांचें मनही त्या काळानें आकर्षण केलें होतें. मग महादेव चिमणाजीसारख्या बुद्धिमान माणसाची मनःशक्ति व पैसा देशी उद्योगधंदे वाढविण्याकडे वळला यात आश्चर्य नाही. भागवत नामक कोणा होतकरू माणसाला त्यानी युरोपांत काही काम शिकण्याकरिता पाठविलें. येथे देखील चाकूकात्र्याच्या कारखान्यात त्यांनी शेकडो रुपये ओतले होते. पण या कामी त्यांना यश आलें नाही. एका टॅनिंग व लेदर मॅन्युफॅक्चरिंग करनीनही त्यानी पांच पंचवीस हजार रुपये घातले होते. पण तेही पुनः परत आले नाहीत. महादेव चिमणाजी हे हरिभाऊंचे चुलते होते तरी त्यांचें हरिभाऊंवर अपत्यवत् प्रेम असे. आनंदाश्रमाशी हरिभाऊंचा जो आजन्म संबंध जडला तो महादेव चिमणाजीमुळेंच. आणि इतरही प्रकारें अण्णासाहेबांच्या आयुष्यक्रमाचा हरिभाऊंच्या जीवनवृत्तावर कसकसा परिणाम झाला हें पुढें यथावकाश समजेलच.

## हरिभाऊंचा जन्म.

हरिभाऊंचा जन्म वऱ्हाडात त्यांच्या आजोळी ता. ८ मार्च स. १८६४ सालीं झाला. हरिभाऊंच पाळण्यातलें नांव बाळकृष्ण असें होतें. पण एक मनुष्य एकाच वेळी दोन जागीं असूं शकत नाहीं, त्याप्रमाणेच एका नावाची दोन माणसे एकाच कुटुंबात असू शकत नाहीत. बाळकृष्ण हें नाव आपट्यांच्या कुटुंबात आधीच दुसऱ्या कोणी पटकाविलें असल्यामुळें हरिभाऊंना त्या नावावरचा आपला हक्क बिनतक्रार सोडून द्यावा लागला! लहानपणीच मातृवियोग होणें यासारखे दुसरें दुर्दैव क्वचितच असेल, आणि तेंच हरिभाऊंच्या वांट्यास आलं. हरिभाऊंना चवथें वर्ष लागते न लागतें तोंच त्यांच्या मातुश्री इहलोक सोडून गेल्या. त्यांच्या वडिलांची नोकरी फिरतीची, त्यांतून हरिभाऊंची आई त्यांना बाल्यावस्थेंतच येथें एकटे टाकून सोडून गेलेली. यामुळें हरिभाऊंचा सांभाळ करण्याचा बोजा आधीच लळा असलेल्या त्यांच्या चुलताचुलतीनें शिरावर घेतल्यास नवल काय! नानासाहेबानीं दुसरें लग्न केलें, दहा माणसांचे घरं-

आजाचें कुटुंब. त्यातून हरिभाऊ म्हणजे थोरला मुलगा. त्यामुळें मर्यादशील नानासाहेब हरिभाऊंना फारसे येत नसत. पुढें तर आईच्या मृत्यूनें मुलाचा व बापाचा संबंध तुटल्यासारखाच झाला. पुढें जुन्या नव्याच्या झगड्यामुळें होणाऱ्या फाटाफुटीचा हा पायाच होय असें म्हणण्यास हरकत नाहीं.

हरिभाऊंच्या मातुश्रींचें देहावसान झालें, तेव्हां महादेव चिमणाजींचें बिऱ्हाड फणसवाडींत होतें. त्या वेळेस घरांत लहान मूल काय ते हरिभाऊच होते. एकुलतें एक मूल आणि तेंही आईवेगळें. तेव्हा त्याचे सर्वांनीं लाड करावे, त्याच्या खेळकरपणाचे कौतुक करावें, चुलताचुलतीस तर त्याला कोठें ठेवूं आणि कोठें न ठेवूं असे होऊन जावें यात कांहीं आश्चर्य नाहीं. चिमुकल्या हरीने कांहीं तरी डोक्यावर घेऊन भाजीवाल्याप्रमाणें ओरडत चाळभर फिरावें अथवा, गारुड्याचा खेळ आवरला कीं हरिभाऊंनीं आपल्या खेळण्याचा पसारा मांडून गारुड्याच्या पवित्र्यांत उभे रहावें व सर्वांगास झोले देऊन माना हालवून पुंगी वाजविण्याचा आविर्भाव करावा किंवा चाळींतल्या बाळूची कोंकणी भाषा बोलून हुबेहूब नक्कल करावी ! कौतुकाच्या चुलतीला व आजीला पोराचें कसे व किती कौतुक करूं असे होऊन जायचें. कोणी ओळखीची मागसें आलीं कीं हरीच्या या सर्व नकला व्हावयाच्या. महादेव चिमणाजींकडे त्यांची अनेक मित्रमंडळी येत. त्यात सरकारी नोकरीस गुलामगिरी हे नांव देऊन तिरस्कारयुक्त बोलल्याचें हरीच्या कानावर येतांच "आपण नाहीं बुवा जन्मांत कोणाची नोकरी करावयाचे' असें सहा सात वर्षांच्या वयापासूनच हरींचें भजन सुरू झालें आणि तेंच अखेरपर्यंत कायम राहिलें. हरिभाऊंचे वडील व नानासाहेबांचे वडील या दोघांचाही सरकारी नोकरींत जन्म गेला. अण्णासाहेबांनाही नोकरीचा थोडा डाग लागला. पण हरिभाऊंनी खरोखरच जन्मात कोणाची नोकरी केली नाही.

यावेळीं नानासाहेबही नोकरीनिमित्त मुंबईसच असत. आपल्या आप्तेष्टांपैकीं कोणालाही ददात असूं नये, आपल्याला जे कांहीं मिळेल त्यांतच सर्वांचा परामर्ष घ्यावा असा या बंधुद्वयाचा बाणा असे. नानासाहेबांची प्राप्ति अण्णासाहेबांपेक्षां अर्थातच कमी असे. पण नातेवाईकांचा परामर्ष घेण्यांत ते अण्णासाहेबांपेक्षांही सरस असत. आपल्या आप्तेष्टांतील व्यक्तींचेंच नव्हे तर त्यांच्या सांद्र कुटुंबाचेंही, आपलेपणाच्या भावनेनें, त्यानीं वर्षानुवर्ष पालनपोषण केलें.

नवराबायको, चार दोन मुलें अशीं जवळच्याच काय, पण दूरच्याही आप्तांचीं कुटुंबें त्यानीं आपल्या येथें वाढविलीं. कित्येकांच्या तर दोनतीन पिढ्याही यांच्याच येथें वाढ ल्या. हरिभाऊंच्या काकी सौ. पार्वतीबाई या हरिभाऊंवर अपत्यनिर्विशेष प्रेम करीत हें न पहावल्यामुळेंच की काय, दुष्ट काळानें या बाईंना इहलोकांतून ओढून नेलें !

## हरीची मुंज.

सौ. पार्वतीबाई यांना हरीच्या मुंजीचा फार ध्यास होता. मुलाची मुंज फार हौसेनें करावयाची, याकरितां त्यांनी जारीनें तयारीही चालविली होती. पण योगायोग तसा नव्हता. हरिभाऊवर मुंजीच्या अक्षदा पडल्याचें पाहणें त्या बाईंच्या दैवीं नव्हतें! हरिभाऊंची मुंज पुण्यास जानोरीकराचे वाड्यात (शेवड्याचा बोळ) झाली. आणि पुन्हां कांहीं दिवसांनी त्यांची मंडळी मुंबईस गेली, त्याबरोबर तेही मुंबईस गेले. त्यांचें मराठी शिक्षण मुंबईसच झालें. त्यांचा स्वभाव अतिशय मनमिळावू असल्यामुळें बाल्यावस्थेंतच त्याचा मित्राचा गोतवळा बराच वाढला. हरिभाऊ सर्वांचे लाडके असल्यामुळें त्यांनी मागितलेली प्रत्येक गोष्ट त्यांना मिळे. पण त्यांत पुस्तकावरच त्यांचें विशेष प्रेम असे आणि महादेव चिमणाजी त्यांना वाटतील तितकी गोष्टींचीं पुस्तकें आणूनही देत. खेळापेक्षा पुस्तकें वाचण्याकडेच त्यांचें लक्ष असे. तरी त्यांबरोबर त्याचा खोडकरपणाचा व लोकांच्या नकला करण्याचा व्यासंगही चालू होता. मुंज झाल्यावर त्यांना कोणी म्हटलें कीं, आतां लंगोटी सोडता कामा नये, म्हणजे त्यानी मुद्दाम लंगोटी सोडून रस्त्यापर्यंत जाऊन यावें. बायका डाळ निवडण्यास बसल्या असता ती उडवून पळावें, अशा अनंत खोड्या करून हरिभाऊ उच्छाद आणीत. तरी पण अण्णासाहेबांचा त्यांना मोठा धाक असे, यामुळें, हरि करील तें करील, या घरांतील इतर माणसांच्या कौतुकाचा परिणाम मर्यादेबाहेर कधींही गेला नाहीं.

## चिमा मावशी.

नानासाहेब व अण्णासाहेब यांच्या कर्त्यासवरत्या बायका चार वर्षांत नाहींशा झाल्यामुळें सर्व कुटुंबाचा बोजा चिमामावशीवर पडला. घरांत नानासाहेबांच्या मातुश्री होत्या; पण पंचवीस माणसांचा पसारा आवरण्याइतकी आक्रमशक्ति त्यांच्यांत नव्हती. अर्थात् नानासाहेबांच्या मावशीवरच—यांनाच चिमामावशी म्हणत—सर्व

जबाबदारी येऊन पडली. या बाई फारच हुषार असत. श्री. काशीताई कानिट-कर या बाईचें पुढीलप्रमाणें वर्णन देतातः—

" नानासाहेब व अण्णासाहेब फक्त हातखर्चाला लागेल येवढी रक्कम आपलेपाशी ठेवून घेऊन बाकी सर्व पैसा तिच्या ( मावशीच्या ) स्वाधीन करीत. ती आपल्या सुना, नातवंडें, वगैरेंना लत्ताकपडा, डागडागिना, औषधपाणी वगैरे सर्व करी. घरांतील वर्षाची धान्य वगैरेची बेगमी करणें, चाकरनोकर पाहून ठेवणें काढणे, लग्नाच्या मुली असल्या तर त्याना स्थळें पहाणें, मुलाना केव्हां मुंजीचा मुहूर्त लाभतो वगैरे पाहून ठेवणें वगैरे सर्व कामे तीच करी. ती व्यवहारात मोठी दक्ष असे. तिचे स्वतःचे मूलबाळ काही एक नव्हते, पण बहिणींच्या परिवारालाच आपलें समजून ती मोठ्या प्रेमाने वागवी व शिक्षण देई."

चुलतीच्या निधनानंतर या बाईनीच हरिभाऊंचें मोठ्या प्रेमाने संगोपन केले. *" आजीची पाठ म्हणजे लहानग्या अपराधी नातवंडाच्या आश्रयाचा अतिशय बळकट असा किल्लाच होय. " हे उद्गार काढताना हरिभाऊंच्या पुढे याच बाई असल्या पाहिजेत. त्यांच्या सख्या आजीचेही त्याच्यावर प्रेम असे. आजीला कुठेही काही मिळो, किंवा घरात आणलें जावो, त्यांतला बराच अंश नातवंडासाठी ठेवला नाही असें व्हायचें नाहीं " हा अनुभव त्याचा स्वतःचाच दिसतो. " लहानपणींच आई वारली असली म्हणजे आजीवांचून दुसरें कोणी लहान पोराना संभाळणारें नसतें. ती जर असली तर आईपेक्षांही जास्त तऱ्हेनें संभाळ होतो. आईपोरकी पोरें झालीं व तीं आजीनें संभाळलेली असलीं म्हणजे ती अतिशयित लाडकीं होऊन थोडीबहुत छांदिष्टही होतात" ( गणपतराव प्र. २). हें गणपतरावाच्या निमित्तानें हरिभाऊंनीं स्वतःचेंच वर्णन दिलेलें असावें. चिमामावशी हरिभाऊंना जीव कीं प्राण करीत. पण धाक दाखविणें जरूर असेल तेथें धाक दाखवावयाचा, अशी त्यांची शिस्त असल्यामुळें हरिभाऊंच्या ठिकाणीं लाडामुळें येणारा छांदिष्टपणा वयापरत्वें बराच कमी होत गेला. मुलांना ओळ लावावयाची ती केवळ धाकानें लावूं म्हटल्यास त्याचे कसे दुष्परिणाम होतात, तेच त्यांत प्रेमाचें प्रमाणशीर मिश्रण असलें म्हणजे ओळ लावण्याचा मूळ

---

* पण लक्षांत कोण घेतो ! प्र. ५ व प्र. ८.

उद्देश कसा उत्कृष्ट रीतीनें पार पडतो, याबद्दलचीं हरिभाऊंनी आपल्या कादंबऱ्यांतून जीं चित्रें रेखाटलीं आहेत त्यांची रूपरेखा या भावशींच्या सांनिध्यानेंच अंकित झाली असली पाहिजे.

## अण्णासाहेबांपुढील पेंच.

अण्णासाहेबांचे कुटुंब वारल्यानंतर त्यांनीं आपल्या वडीलभावाप्रमाणें यथाक्रम नवीन संसार थाटावयाच्या तजविजीस लागावयाचें; पण पुनर्विवाहपंथाचे ते एक प्रमुख पुरस्कर्ते असल्यामुळें त्याना तसें करणे उचित वाटलें नाहीं. आप्तसंबंधी माणसांचा पाश तोडून पुनर्विवाह करावा तर तितकी त्यांच्या मनाची तयारी होईना. बरें, जुन्या पंथाप्रमाणें दुसरें लग्न करावें तर तिकडूनही फजीती होणार, असा त्यांच्यापुढे पेच आला आणि पुन्हां लग्न करावयाचे नाही असा निश्चय करून ते या पेंचांतून तात्पुरते तरी बाहेर पडले. तात्पुरते म्हणण्याचें कारण आजन्म अविवाहित राहण्यांत विशेष अवघड गोष्ट जी असते ती त्यांच्या हातून पार पडली नाहीं. रगड पैसा मिळणे, लोकांत मानमान्यता वाढत जाणें, कोणत्याही गोष्टीची उणीव नसणें अशा स्थितींत अविवाहित राहणें म्हणजे एक भयंकर दिव्यच होते. अण्णासाहेबांनी दुसरें लग्न केलें नाही इतकेच; पण त्यांना आपला आयुष्यक्रम शुचिर्भूत रीतीने घालवितां आला नाहीं. 'मधली स्थिति' या कादंबरींत ज्या दोन दुष्परिणामीं दुर्व्यसनाचें हरिभाऊंनी वर्णन दिलें आहे त्याचा घाला अण्णासाहेबांच्यावर याच वेळीं पडला. आणि थोडक्याच दिवसांत त्याचे घर कुटुंबवत्सलास राहण्याला सर्वस्वी नालायक बनले; अर्थात आपला सर्व आप्तपरिवार मुंबईहून हालवून पुण्यास बिऱ्हाड थाटावें असा नानासाहेबांना विचार ठरवावा लागला.

## तामसी होते तितकेच प्रेमळ होते.

नानासाहेब व अण्णासाहेब हे दोघेहि बंधु कर्मठपरंपरेंत वाढले होते. त्यांतुन अण्णासाहेब हे तर नवीन पद्धतीनें शिकले सवरलेले. ब्रह्मकर्मांचे सर्व विधि त्यांना नानासाहेबांप्रमाणेंच तोंडपाठ येत. याशिवाय त्यांना उपनिषदादिग्रंथही मुखोद्गत होते. तरी पण एकंदर आयुष्यक्रमाचा विचार करितां पावित्र्यासंबंधांत नानासाहेबांचा आयुष्यक्रमच अण्णासाहेबांपेक्षां सर्व तऱ्हेनें श्रेष्ठ ठरला. नानासाहेब हे एकधोरणी, सालस व मोठे करारी होते. कधी कधीं जुन्यानव्याच्या झगड्यांत त्यांचा संताप आतिरेकास जाई. राव बहादूर पारसनीस हे हरिभाऊंचे

स्नेही होते. ते विलायतेस जाऊन आल्यानंतर "नेहमींप्रमाणें हरिभाऊंच्या वडिलांना भेटावयास गेले. त्या वेळीं त्या तामसी ब्राह्मणानें (हरिभाऊंच्या वडिलांनी) त्यांचा अपमान करून पुन्हां घरीं न येण्याबद्दल त्यांना बजाविलें" अशी हकीकत *"हरिभाऊशी दोन घटका" या मथळ्याखालीं प्रसिद्ध झालेल्या आपल्या लेखात कै. एकनाथ पांडुरंग रेंदाळकर यानी दिली आहे. हरिभाऊंच्या वडिलां-संबंधानें त्यांच्या लेखात एवढाच निर्देश आहे. तो तसाच राहूं देणें म्हणजे हरिभाऊंच्या वडिलांवर अन्याय करण्यासारखें आहे. धर्ममतासंबंधानें ते फार कडवे होते ही गोष्ट खरी आहे. पण जुनी परंपरा हाडींमासी खिळलेली व नवीन विचाराचें ज्याना वारेंहि नाहीं अशा गृहस्थांत हा अवगुण असणें अक्षम्य होतें असें कोणासही म्हणतां येणार नाहीं.

"जितका मनुष्य तामसी तितकाच तो प्रेमळही असतो. त्याच्या मनोविकाराना त्याला आळा घालता येत नाहीं. संताप येण्यास कारण झालें म्हणजे ज्याप्रमाणें त्याची तामसी वृत्ति उसळून त्याच्या विचारशक्तीस दुर्बळ करून सोडते त्याचप्रमाणें दया, प्रेम वगैरे वृत्तिसिही जणूं काय मनांतून हद्दपार करून टाकते. त्याचप्रमाणें त्याची प्रेमवृत्ति जागृत होण्यास कांहीं कारण झाल्या-बरोबर ती उचंबळून बाकीच्या सर्व वृत्तिंस मनांतून त्या वेळेपुरतें नष्ट करून टाकते." हें दादासाहेबांचें वर्णन हरिभाऊंनीं आपल्या 'भयंकर दिव्य' (प्रकरण ५० पा. २८५) या कादंबरींत दिलें आहे. त्या वेळी हरिभाऊंनी आपल्या पुढें वडिलाच्या स्वभावाचाच फोटो धरिला असला पाहिजे.

ज्यांचा वस्तुतः संबंध नाही अशा दहा पांच माणसांचा परामर्ष घेणारे नानासाहेब केवळ तामस वृत्तीचे निधि किंवा माणूसघाणे असतील हें केव्हांही संभवत नाही आणि ते तसे नव्हतेही. त्यांच्यासारखीं सच्छील, सद्वर्तनी, एक-धोरणी व एकवचनी माणसें हल्लींच्या पिढींतही क्वचितच सांपडतील. जुन्या परंपरेत वाढलेल्या माणसांत, नवीन विचारानें प्रगल्भ झालेल्या गृहस्थांनाही अवश्य अनुकरण करण्यासारखे कांहीं सद्गुण असतात हें दाखविण्यासाठीं हरि-भाऊंनीं आपल्या पुस्तकांतून ज्या भूमिका योजिल्या आहेत त्यांतील सर्वोत्कृष्ट जी दादासाहेबांची भूमिका, ती त्यांनीं आपल्या वडिलांच्या दिनचर्येवरूनच रेखाटली असली पाहिजे. हरिभाऊंना जुन्या नव्या धर्ममतांच्या झगड्यात

* मासिक मनोरंजन, एप्रिल १९१९.

वडिलांच्यापासून त्रास झाला असला, त्यापासून त्यांना कितीहि दुःख झालें असलें तरी वडिलांच्या अंगचे सद्गुण ते पूर्णपणें जाणून होते आणि त्यांचा ते नेहमीं आदरपूर्वकच उल्लेख करीत हें येथे सांगणें जरूर आहे. रा. रेंदाळकर यांनी हरिभाऊंच्या वडिलांच्या स्वभावांतील एकच विशेष आणि तोही त्यांच्या-बद्दल लोकांच्या मनांत अनादर उत्पन्न व्हावा असा विशेष आपल्या लेखांत दिला, म्हणूनच यासंबंधानें इतका विस्तृत खुलासा करावा लागला.

दहा माणसांच्या कुटुंबांत हरिभाऊ वाढले असल्यामुळें अनेक स्वभावाचीं, अनेक मनोवृत्तींचीं व अनेक आवडीनिवडीचीं माणसें पहाण्याची त्यांना लहान-पणीच संधि मिळाली. आणि आपल्या भेदक व मर्मसंशोधक अशा निरिक्षणशक्तीनें त्यांनीं या सर्वांचें आकलन करून आपल्या ओजस्वी वाणीनें त्यांचे हृदयंगम शब्द-चित्र आपल्या कादंबऱ्यांत रेखाटून समाजाची दृष्टि अंतर्मुख केली. अविभक्त कुटुंबांत वाढलेली व निरनिराळ्या लोकसमूहांत वावरणारी माणसें शेकडों-गणती निघतील; पण आपल्या डोळ्यांचा व डोक्याचा उपयोग करून समाजा-च्या डोळ्यांत त्यास उपकारक असें दिव्यांजन घालणारा हरिभाऊंसारखा प्रति-भावान् व प्रेमळ प्राणी शंभर वर्षांतून एखादाच निघतो ही गोष्ट त्यांच्या कादं-बऱ्या वाचणारांच्या अंतःकरणास पूर्णपणे पटल्यावांचून रहाणार नाहीं.

———

# प्रकरण दुसरें.

## मुंबईहून पुण्यास आल्यावर.

### तात्या पंतोजी.

हरिभाऊ पुण्यास आले तेव्हां त्यांचे वय १४ वर्षांचें होतें. पुण्यास आल्यावर हायस्कूलमध्ये ते इंग्रजी ४ थ्या इयत्तेत शिकूं लागले. इतक्या अल्प वयांतच आपल्या बुद्धिवर्चस्वानें त्यांनी आपल्या मित्रमंडळीवर छाप बसविला. याच वेळेला हरिभाऊंची नैसर्गिक लेखनप्रवृत्ति हळुहळू वाढत जाऊन किरकोळ कवनें व लेख या स्वरूपांत ती प्रगट होऊं लागली. घरांतील किरकोळ प्रसंगावर कविता कराव्या, भांडणाची वगैरे हकीकत लिहावी, इंग्रजी कवितेतील बारीक चुटक्याचें कविताबद्ध भाषांतर करावें, हा त्यांचा क्रम वृद्धिंगतच होत चालला. पुढें जी आपल्या कादंबरीत त्यांनी अनेक प्रकारच्या स्वभावाची व मनोव्यापाराची मनोज्ञ चित्रे रेखाटलीं आहेत, त्यांपैकीं कांहीं निवडक नमुने ते यावेळीं आपल्या मित्रमंडळीस साविर्भाव करून दाखवीत. जानवेकराच्या वाड्यांत हरिभाऊ रहात असत, तेथेंच बोळाचे तोंडाशीं ठोसरांचे वाड्यांत एका तात्या पंतोजीची शाळा असे. या पंतोजींची मजा पहाण्याकरितां हरिभाऊ तेथे जाऊन बसत असत. 'मी' कादंबरीतील प्रकरण ८ मध्यें त्यांनी तात्या पंतोजीचें जें विनोदी वर्णन दिले आहे तें या वेळचेंच असावें असें वाटतें. जुन्या अमदानींत हे प्रसंग प्रत्यक्ष अनुभवलेले असे जे कांही गृहस्थ असतील त्यांनाच या वर्णनाची यथार्थता विशेष पटणार आहे.

### संस्कृत शिकविणारे शास्त्री.

हरिभाऊंना संस्कृत वगैरे शिकविण्यात मुद्दाम एक शास्त्रीबोवा ठेविलेले असत. अमरकोश, कालिदासाचीं नाटकें, रघुवंश, वगैरेंचा अभ्यास त्यांनीं याच शास्त्रीबोवांचे नजरेखाली केला. साधारण बुद्धिवान् मुलाला देखील शाळेंत वर नंबर ठेवितां येतो, मग हरिभाऊंसारख्या हुषार मुलाचें तेज वर्गांत पडून

त्याचा मित्रमंडळीवर वचक बसावा यांत आश्चर्य नाहीं. पण हें फक्त प्रथम प्रथमच होतें. पुढें शिक्षणक्रमांत नेमलेल्या विषयांचें व हरिभाऊ वाचीत असत त्या पुस्तकाचें गोत्र न पटल्यानें हरिभाऊंच्या विद्यार्थिपणांत साहजिकच फरक होत चालला. याच वेळीं 'मी'मधील शिवरामपंतासारखा "चांगल्या गोष्टींचें काय किंवा वाईट गोष्टींचें काय, व्यसन झालें, त्या गोष्टी आपल्या कर्तव्याआड येऊं लागल्या म्हणजे नुकसान हें व्हावयाचेंच. आपल्याला एखादी गोष्ट अतोनात आवडते पण ती जर आपल्या कर्तव्याचे आड येऊं लागली तर त्या आवडीस धरबंधच घातला पाहिजे समजलास!" असा उपदेश करणारा हरिभाऊंना खऱ्या कळवळ्याचा एखादा मार्गदर्शक मिळाला असता तर परीक्षा नापास होण्याबद्दल पुढें त्यानी जो लौकिक मिळविला तो त्यांना कदाचित् टाळतां आला असता.

## न्यू इंग्लिश स्कूल.

हरिभाऊ १८७८ सालीं पुण्यास आल्यानंतर सुमारें दोन वर्षांनीं न्यू इंग्लिश स्कूल स्थापन झाले. या शाळेंतील अगदीं आरंभींच्या विद्यार्थ्यांपैकी ते एक होते. प्रो. राजवाडे, प. वा. हरि कृष्ण परांजपे, प्रो. आर्ते, रा. रा. मो. साने, रा. वामनराव रानडे, प्रो. ना. स. पानसे, प्रि. बापुसाहेब ढेकणें ही मंडळीहि न्यू स्कूलमध्यें जाण्यासाठीं आधीं चार चार महिने शाळा सोडलेल्या विद्यार्थ्यांपैकीच होत. ही वेळ मोठी खळबळीची होती. महाराष्ट्रांत आज जी जागृति दिसत आहे तिची प्राणप्रतिष्ठा याच काळांत केली गेली. प. वा. रा. सा. रानडे, प. वा. महादेव मोरेश्वर कुंटे, प. वा. विष्णुशास्त्री चिपळूणकरप्रभृति थोर व विद्वान् पुरुषांच्या वास्तव्यानें याच वेळी पुणें शहर मंडित झालें होते. लोकांमध्ये आत्म-निरीक्षणाची प्रवृत्ति उत्पन्न करून त्यांचा उत्साह कार्यप्रवर्तक करावयाचा अशी एका बाजूनें रा. सा. रानडे यांची चळवळ सुरू झाली तर दुसऱ्या बाजूनें लोकांना पूर्ववैभवाचें स्मरण करून देऊन त्यांच्या वृत्ति उत्तेजित करावयाची चळवळ कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर हे आपल्या ओजस्वी लेखणीनें निबंधमालेच्या द्वारा करीत होते. ज्या अवगुणामुळें आपली परवश स्थिति झाली, ते अवगुण काढून टाकण्याबद्दल लोकांना उपदेश करण्याचे कामीं एक पक्ष झटत होता, तर दुसरा पक्ष लोकांच्या अंगीं गुण आहेत, सर्व कांहीं आहे, पण त्यांची परकीय राज्यामुळें माती होत चालली आहे असें प्रतिपादन करून "असंतोषः श्रियो मूलं" या वचनाच्या अनुरोधानें लोकजागृति करीत

होता. या दोन मार्गांत निवड करणें हें त्यावेळच्या तरुण माणसांच्या पुढें फार मोठें अवघड काम होतें. हे दोन्ही मार्ग आपापल्या परीनें देशकार्यार्थ अवश्य आहेत ही जाणीव हरिभाऊंसारखी त्या वेळीं दुसऱ्या कोणास क्वचितच झाली असेल. हरिभाऊंनीं आपल्या सामाजिक कादंबऱ्यांनीं पहिली कामगिरी केली व त्यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्यांनीं दुसऱ्या पक्षाच्या कार्यास सहाय्य केलें.

## शास्त्रीबुवा.

हरिभाऊ व त्यांचे मित्र हायस्कूल सोडून न्यू इंग्लिश स्कूलमध्यें गेले त त्या सर्वांना विष्णुशास्त्रयांच्याबद्दल अत्यंत आदर वाटत होता म्हणूनच गेले, हें उघड आहे. न्यू स्कूल निघण्यापूर्वी शास्त्रीबुवा हायस्कूलमध्ये शिक्षक होते. त्यामुळें त्यांच्याशी या विद्यार्थ्यांचा आधींच परिचय जडलेला होता. त्यावेळीं शास्त्रीबुवाच्या निबंधमालेने सर्व समाजांत खळबळ उडवून दिली होती ही गोष्ट सुप्रसिद्धच आहे. मराठी लेखनकलेंत एक प्रकारची जाज्वल्यता व तेजस्विता आणण्याचें काम प्रथम शास्त्रीबुवांनचि केले. परकीय संस्कृतीचे विचार बेमालूम रीतीने मराठी भाषेंत व्यक्त करण्याची शास्त्रीबुवांची हातोटी प्रशंसनीय होती. अशा गृहस्थांचा हरिभाऊंसारख्या बुद्धिवान व प्रतिभासंपन्न तरुणावर विशेष परिणाम व्हावा व आपल्यापुढे विष्णुशास्त्रयाचा आदर्श ठेवण्याची त्याच्या ठिकाणीं इच्छा व्हावी हे स्वाभाविकच होतें. विचारास थोडी प्रगल्भता आल्यानंतर हरिभाऊ म. गो. रानडे यांचे कट्टे अनुयायी बनले. पण आरंभीं त्यांच्या मनावर जर कोणाची विशेष छाप बसली असेल तर ती विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचीच होय. त्यांच्या भाषेची ओजस्विता व सामर्थ्यवत्ता याबद्दल हरिभाऊंना विशेष आदर व कौतुक वाटे. हरिभाऊ हे निबंधमालेचे कट्टे भक्त होते, पण ते मालेची अगर तिच्या कर्त्यांची नुसती प्रशंसा करूनच राहिले नाहींत, तर विष्णुशास्त्रयांचा आदर्श पुढें ठेवून आपणही वाङ्मयमंदिराची शोभा वाढविण्याचा प्रयत्न करावा अशी त्यांनीं आकांक्षा बाळगिली. ही आकांक्षा विद्याभ्यासंग व प्रतिभासंपन्नता यांच्या जोरावर हरिभाऊंनी कशी फलद्रूप केली याची साक्ष त्यांची सुंदर पुस्तकें व त्याचे विविध विषयांवरील लेख पटवीतच आहेत.

## शिक्षकांचें प्रेम.

आपल्या कुशाग्र बुद्धीमुळें आपल्या समवयस्क स्नेही मंडळींचें चित्त हरिभाऊंना आकर्षण करून घेतां आलें, इतकेंच नव्हे तर, काव्यमर्मज्ञता व

ज्ञानलालसा यांच्यायोगानें आगरकर, टिळक, आपटे, केळकरप्रभृति आपल्या गुरूंचेंही प्रेम व आदरबुद्धि त्यांना संपादन करिता आली. हरिभाऊ वर्गात बसले म्हणजे विद्यार्थी, पण वर्ग सुटला म्हणजे ते आपले स्नेहीच आहेत अशी त्यांच्याबद्दल त्याच्या शिक्षकमंडळीची भावना असे. हरिभाऊंचा विद्यार्थिदशेचा हा काळ म्हणजे ३५ वर्षांपूर्वीचा होय. त्यावेळेस सातव्या इयत्तेतील विद्यार्थ्यांनाही छड्या खाव्या लागत. पण हरीला कधी छडी मारावयाची नाही असा सर्व शिक्षकांचा कृतसंकल्प असे. प्रो. वासुदेवराव केळकर हे तर हरिभाऊंशी विशेष स्नेहानें व प्रेमानें वागत. हरिभाऊंच्या रसिकपणाबद्दल त्यांना इतका आदर वाटे की, त्यानी स्वतः कोणताहि लेख किंवा कोणतेही पुस्तक लिहिले तरी ते हरिभाऊंना आधी दाखवीत असत. एकदां तर ते मार्मियन शिकवीत असता हरिभाऊंनी एका कवितेचा अर्थ सुचविला तो त्यांनी ग्राह्य मानला, आणि ते खरें असेल ह्यात शंकाच नाही. कारण प्रो. वासुदेवराव केळकर हे जसे गुणी होते तसेच गुणग्राहीही होते ही गोष्ट सुप्रसिद्धच आहे.

## शाळेंतून कॉलेजांत.

हरिभाऊची प्रवेशपरीक्षा १८८३ साली झाली. त्यांच्या आयुष्यांतील परीक्षा पास झाल्याचा हा एवढाच प्रसंग होय! प्रवेशपरीक्षा झाल्यानंतर ते डेक्कन कॅालेजमध्यें शिकावयास गेले. तेथे आपल्या हुशारीमुळे ते लवकरच प्रोफेसराचे परिचित झाले. तेथेंही प्रोफेसरांनीं काव्यातील किंवा नाटकातील एखाद्या भागाचा अर्थ सागावा व त्यावर हरिभाऊंनी दुसरा अर्थ सुचवावा आणि प्रोफेसरानी तो त्याचा अर्थ मान्य करावा असे प्रसंग कित्येक वेळां येत. डॉ. भांडारकर हे या वर्षी शाकुंतल शिकवीत असता ५ व्या अंकात एके ठिकाणीं हरिभाऊंनी एक वेगळा अर्थ सुचविला. प्रथम डॉ. भाडारकराना तो पसंत पडला नाही, पण दुसऱ्या दिवशी ते वर्गात आले, त्यावेळेस हरिभाऊंनीं आदल्या दिवशीं सागितलेला अर्थ बरोबर आहे असें त्यांनीं वर्गात आल्याबरोबर सांगितले. हरिभाऊंची ही काव्यमर्मज्ञता ते बी. ए. च्या वर्गात असतां—आणि याच वर्गात त्यांना तीन चार वर्षें घालवावी लागली—अनेक वेळा दृष्टोत्पत्तीस आली. य त्याच्या मर्मज्ञतेमुळे व विद्याभिरुचीमुळे डॉ. भाडारकराच्यासारख्या विद्वद्वर्यांचें त्यांच्यावर प्रेम बसावें हें स्वाभाविकच होतें. हरिभाऊंवरील त्यांचें हें प्रेम पुढेंही अव्याहत व अखंडित राहिलें होतें. लेखनव्यवसायाबद्दल हरिभाऊंची पुढें प्रसिद्धी

झाली तेव्हां तर डॉ. भांडारकर हे त्यांच्याशीं मित्रत्वाच्या नात्यानें वागत असत. डॉक्टर भांडारकर यांच्याकडून कोणाला कांहीं काम करून घ्यावयाचें असलें तर हरिभाऊंची चिठ्ठी नेली की तें हमखास व तावडतोब व्हावयाचें, इतकें त्याच्यावर हरिभाऊंचें वजन असे. हे सर्व बस्तान ठीक होतें. पण परीक्षेच्या अभ्यासाचा व हरिभाऊंचा बारावा बृहस्पति केव्हांच पालटला नाहीं. डेक्कन कॉलेजमध्यें त्यांचा बहुतेक वेळ रीती-प्रमाणें अवांतर पुस्तकें वाचण्यातच गेला, आणि अखेर परीक्षेचा निकाल व्हावयाचा तो होऊन ते दुसऱ्या वर्षी फर्ग्युसन कॉलेजमध्ये पुन्हा पी. ई. च्या वर्गात आले.

## डेक्कनमधून फर्ग्युसनमध्यें.

न्यू इंग्लिश स्कूलमधील हरिभाऊ जसे पहिले विद्यार्थी, त्याप्रमाणेच फर्ग्युसन कॉलेजच्या स्थापनसालीही ते त्या कॉलेजचे विद्यार्थी झाले. तेथील प्रोफेसर मंडळी आणि हरिभाऊ यांचा गुरुशिष्यसंबंध पूर्वीचाच होता. तेथें पूर्वीप्रमाणेच कै. वामनराव आपटे, प्रो. केळकर प्रभृति प्रोफेसरांची त्यांची कित्येक वेळां वाङ्मयविषयक चर्चा होई व प्रोफेसरांच्याकडून काव्यमर्म ओळखल्याबद्दल हरिभाऊंनी धन्यवाद मिळविल्याचे अनेक प्रसंग येत; पण याही वर्षी परीक्षेचा त्याचा नन्नाचा पाढा चुकला नाहीं व ते याच्या पुढच्या वर्षी म्हणजे १८८६ साली पुन्हां डेक्कन कॉलेजमध्यें गेले.

## फर्ग्युसनमधून पुनः डेक्कनमध्यें.

प्रो. भानू, प्रो. विजापूरकर, रा. नारायण महादेव समर्थ वगैरे मंडळी याच वेळेस या कॉलेजमध्यें होती. याच वर्षी येथे रीडिंगरूम व लायब्ररी स्थापन झाली. या लायब्ररीत घ्यावयाच्या पुस्तकांची निवड करणारांपैकीं हरिभाऊ हे एक होते. या लायब्ररींतील कित्येक पुस्तकें त्यानी एका वर्षात वाचली, पण इंग्लिश व संस्कृत याशिवाय बाकीच्या विषयाचें त्यांना दर्शन न घडल्यामुळें परीक्षेचा निकाल व्हावयाचा तोच झाला. हरिभाऊ एकंदर परीक्षेंत नापास होत असले, तरी ज्या विषयात ते पास होत असत त्या विषयाच्या परीक्षकास त्यांचा पेपर वाचून कौतुक वाटल्याशिवाय राहात नसे. हरिभाऊ पी. ई. चे परीक्षेस बसले होते, त्यावेळेस प. वा. बाबासाहेब पेंडसे हे संस्कृतचे परीक्षक होते. "परीक्षेला बसलेल्या सर्व विद्यार्थ्यांत हरिभाऊंचाच पेपर

मला उत्कृष्ट वाटला " असे त्यांनी एकदां उद्गार काढले होते. इंग्लिशसंबंधांतही त्यांचा असाच लौकिक असे. या पेपरमध्यें विशेषतः पॅराफ्रेजबद्दल त्यांची प्रशंसा होत असे.

## गणितांतील अगणित अडचणी।

इतकेंही असून ते परीक्षा नापास होत असत, याचे कारण गणिताकडे त्यांचें दुर्लक्ष होतें हें होय. हरिभाऊंसारख्या बुद्धिवान् माणसाला, प्रयत्न केला असता तर गणित विषय पारंगत करून घेता आला नसता असें नाहीं. पण एकदां एक विषय आपल्याला येत नाहिं, त्यावर परिश्रम करणें निरर्थक होणार अशी समजूत झाली म्हणजे त्या विषयाकडे मनुष्याचे साहाजिकच दुर्लक्ष होते. हरिभाऊंना 'तुम्ही गणित कां करीत नाही' असा कोणी प्रश्न केला म्हणजे ' गणित विषयांत अगणित अडचणी आहेत ' असे ते विनोदाने सांगत. लहानपणीं वाचनाचा किंवा लेख लिहिण्याचा नाद लागून विद्याभ्यासाचें मातेरें झालेले असे विद्यार्थी कांही थोडे थोडके सांपडत नाहीत. अशा विद्यार्थ्यांत हरिभाऊंसारखे पुढे नाव करणारे मात्र फारच थोडे असतात. ' मी ' कादंबरींत शिवरामपंतानी ' मी'ला केलेला उपदेश हरिभाऊनी लिहिला त्या वेळेस विद्यार्थिदशेंतील स्वतःचीच स्थिति त्याच्या डोळ्यांसमोर असली पाहिजे. ' मी ' ऊर्फ भाऊ याने एक पुस्तक वाचण्याच्या नादांत एके दिवशीं शाळेला बुट्टीस दिली. ही गोष्ट समजल्यावर शिवरामपंत भाऊस म्हणतात:--

"तुझ्या या वयातच वाचनाचा किंवा कविता करण्याचा किंवा काही लेख लिहिण्याचा नाद लागला की, पुढें सगळेंच मोठाले कवि किंवा मोठे पंडित किंवा मोठे वक्ते होतात असें नाहीं. हजारात एखादा तरी होतो किंवा नाही कोणास ठाऊक. बाकी सारे अनिष्ट स्थितीलाच जातात. एखादी कविता केली. आपल्या स्नेही मंडळींत थोडेंसें बरें भाषण केलें किंवा एखादा निबंध लिहिला आणि त्याबद्दल स्नेह्यांनी वाहवा केली कीं चढून जाऊन त्याच नादाला लागणारे आपण कवी, किंवा वक्ते किंवा निबंधकार होणार असें वाटूं लागून त्यामुळें आपल्या अभ्यासावर पाणी ओतून नुकसान करून घेतलेले किती लोक आहेत याची तुला कल्पना आहे ? एकदा अमुक विषयात कोणी बरा आहे असें म्हटले की लागली त्याची त्याच विषयाकडे लहर ! मग इतर विषयांचें काही का होईना ? किंबहुना इतर विषय आपल्याला येत नाहींत यातच त्याला प्रौढी वाटावयाला

लागते. अशा प्रौढमिळें किती मुलांचें नुकसान झालें आहे याची तुला आज कल्पना नाहीं. आजचा तुझा पहिलाच दिवस आहे म्हणून तुला मी सांगतों आहें." ( मी—प्र. ३३ )

## कॉलेज सोडणारांचे गुरुजी !

'लहानपणीं अभ्यास सोडून इतर वाचनाचा व्यवसाय करणाऱ्या विद्यार्थ्यांपैकी हजारांत एखादा तरी पुढें मोठा पंडित होतो किंवा नाहीं कोणास ठाऊक' हें शिवरामपंताचें विधान यथार्थ नाहीं असें कोण म्हणेल ? हरिभाऊ यास अर्थातच अपवाद होते हें त्यांच्या पुढील चरित्रक्रमावरून कोणास सांगावयास नकोच. हरिभाऊंनी कॉलेज सोडले त्या वेळी त्यांच्या कित्येक स्नेह्यांनीहि विद्यार्थिदशेचा निरोप घेतला. ह्या स्नेह्यांच्या घरचीं वडीलधारी माणसें हरिभाऊंना "कॉलेज सोडणारांचे गुरुजी" असें म्हणत ! सामान्य व्यवहारापलीकडे ज्याची दृष्टि जात नाही किंवा हरिभाऊंसारखें ज्यांना आजकालच्या गोष्टींचे निरीक्षणच काय पण उद्याच्या गोष्टींचेंही अगाऊ आकलन करण्याचे सामर्थ्य नाही, त्यांनी हरिभाऊबद्दल असे विधान करावें यांत काही आश्चर्य नाही. हरिभाऊ पुढें आपल्या उत्कृष्ट ग्रंथांनी समाजाचे गुरुजी झालेले पाहण्यास, या वडीलधाऱ्या माणसांपैकीं जे हयात होते, त्यांना आपल्या वरील विधानाची आठवण होऊन अर्थातच विस्मय वाटल्याशिवाय राहिला नसेल !

# प्रकरण तिसरें.

## पंचविशीच्या आंतील लेखनव्यवसाय.

### आजन्म विद्यार्थी.

व्यवहारांत सामान्यतः ज्या काळास विद्यार्थिदशा असे समजण्यात येत असे, तो हरिभाऊंचा काळ त्यांच्या वयाच्या २४ व्या वर्षी समाप्त झाला. पण हरिभाऊ हे वस्तुतः आजन्म विद्यार्थी होते. इतकेंच नव्हे तर विद्येचें मर्म संशोधन करणारे होते. हरिभाऊंची बुद्धि खरोखरच अष्टपैलू होती. त्यांच्याजवळील ग्रंथसंग्रह विविध प्रकारचा असे. वाङ्मयाच्या एकाच शाखे-पुरते त्यांचे वाचन मर्यादित नसे. इतिहास, अर्थशास्त्र, समाजशास्त्र, शासन-शास्त्र वगैरे अनेक शास्त्रावरील ग्रंथ त्यांचेपाशी असत आणि ते अगदी आज तारखेपर्यंतचे असत. कोणतेही वाचनीय असें नवीन पुस्तक निघो, ते हरि-भाऊंनी खरेदी करावयाचेंच. याची किंमत कितीही असली तरी त्याची ते पर्वा करावयाचे नाहीत. नवीन पुस्तकें कोणती झाली हें साधारणतः त्यांना अगदीं बरोबर माहीत असे. इतकेंच नव्हे, तर त्यांतील मुद्याचा भागही त्यांना अवगत असे, निदान तो काढून दाखवावयाचा असल्यास ते चटकन काढून दाखवीत. हरिभाऊंच्या सहवासांत असलेल्या माणसांपैकी जी काही थोडी विद्याभिरुचि बाळगणारी होतीं, त्यांना त्यांच्या बहुश्रुततेचा कमीअधिक फायदा होत असे.

### विद्येचे एकनिष्ठ उपासक.

सकाळपासून संध्याकाळपर्यंत येणाऱ्या जाणाऱ्या माणसांची कितीही गर्दी असो, हरिभाऊंच्या हातांत एखाद्या हरिभक्तिपरायण माणसाच्या हातांत जपाची माळ असावी त्याप्रमाणें, एखादें पुस्तक हें असावयाचेंच. आणि या पुस्तकांत एखादा मनोरम भाग त्यांना आढळला तर तो ते भोवतालच्या मंडळींना अवश्य वाचून दाखवावयाचे. ही मंडळी नेहमींच रसिक अभिरुचीची असे असें नाहीं.

कित्येक तर हें वाचन श्रवण करण्याचा कंटाळाही करीत. आपण हे वाचन त्याच्यावर बळजबरीनें लादीत आहोंत ही गोष्ट हरिभाऊंना समजत नसे असेही नाही. पण ग्रंथाच्या सौन्दर्यानें ते इतके तल्लीन होऊन जात की, हें समजूनही विवक्षित भाग वाचून दाखविण्याचा मोह त्याना आवरून धरवत नसे। विद्येचे ते खरोखरच एकानिष्ठ भक्त होते. पुस्तके वाचून त्याना कोठें शिकवावयाचे होतें किंवा कोठे व्याख्यानें द्यावयाची होती, अशातला भाग नव्हता; पण केवळ विद्येची महती म्हणूनच ते तिची उपासना करणारे होते. मनाची प्रगल्भता व संस्कृति वृद्धिंगत करण्यास साह्यभूत होणारे असे प्रायः सर्व विषय त्याना परिचित असत. सर्वच विषयात त्याची पूर्ण गति होती, अशी अर्थातच स्थिति नव्हती व तसें होणें शक्यही नव्हते. स्वतः गाता आलें नाही तरी गवई गाऊं लागला की त्यातलें हृद्गत समजावयाचे, त्यात चांगल्या–वाइटाची निवड करता यावयाची, अशा माणसाला जशी गाण्याची माहिती आहे असे म्हणतात, त्याप्रमाणेच हरिभाऊंची अनेक विषयात गति असे त्याच्याशी बोलावयाचें म्हणजे घरच जपून बोलले पाहिजे असा विशिष्ट विषयात पारंगत असलेल्या माणसासही वचक बसावा इतके त्याचें वाचन विस्तृत व वैचित्र्यपूर्ण असे. वाङ्मय हा तर त्याचा हातखंडा विषय असे. त्यात त्याची विवेचक व चिकित्सक शक्ति पदोपदी दृष्टोत्पत्तीस येत असे.

## भवभूति श्रेष्ठ कीं कालिदास श्रेष्ठ ?

या शक्तीचे निदर्शन त्याच्या कॉलेजच्या दिवसातही वेळोवेळी कसे होत असे याचे दिग्दर्शन यापूर्वी केलेच आहे. त्याच्या या चिकित्सक शक्तीची चिन्हे त्याच्या अगदी अल्प वयातही दिसून आली. संस्कृत कवीमध्ये हरिभाऊंची कालिदासावर विशेष भक्ति असे. "कालिदास, शेक्सपिअर व भवभूति" या मथळ्याखाली प्रि. आगरकर यानी सन १८८१ साली केसरीत एक लेख लिहिला होता. त्यात त्यानी कवि या दृष्टीनें भवभूतीची योग्यता कालिदासाहूनही अधिक आहे असे विधान केलें होते. तें हरिभाऊंना अर्थातच पसंत न पडून त्यानी "विचारी" या सहीने केसरीकडे एक पत्रव्यवहार पाठविला. तो त्या पत्राच्या त्याच सालच्या ता. २९ मार्चच्या अंकात प्रसिद्धही झाला आहे. या लेखात भवभूतीहून कालिदास हा कसा आधिक सरस व मनोज्ञ कवि आहे, हें त्याच्या ग्रंथातील अनेक उतारे देऊन त्यांनी दाखविलें होतें. त्याचे चुलते

कै. अण्णासाहेब आपटे याजबरोबरही त्याच या विषयासंबंधाने पुष्कळ वेळां वादविवाद होई. हरि आपली बाजू मोठ्या आवेशानें पण मार्मिक रीतीने प्रतिपादन करीत आहे हें पाहून अण्णासाहेबाना कौतुकच वाटे. त्याचा हा वादविवाद नुसता तोंडातोंडीच नव्हे तर कित्येक वेळा पत्रव्यवहारानेंही चालत असे.

## केसरीवरील श्लोकाचें भाषांतर.

याच सालात " स्थिति नो रे दध्याः " हा जो जगन्नाथ पंडिताचा श्लोक केसरीवर येतो त्याचे पद्य भाषांतर करून हरिभाऊंनी केसरीकारांकडे विद्यार्थी या सहीने पाठविलें होते. हरिभाऊंनी या श्लोकावर आपली सही करून तो पाठविला असता तर आगरकरानी अर्थातच त्यास योग्य स्थान दिले असतें. कारण त्याच्या आवडत्या हरीकडून आलेल्या श्लोकाचा त्यानी केव्हाही अव्हेर केला नसता. पण बिनसहीने आलेल्या या श्लोकास त्यानी बिनतक्रार योग्य स्थळ दिले यात हरिभाऊंच्या काव्यविशारदतेची विशेषच पारख झाली असें म्हणावें लागतें. केसरीकरिता त्यानी जो श्लोक पाठविला तो खालीलप्रमाणे होता.

> द्विपेंद्राच्या नाथा क्षणभरिहि या दुर्धर वनीं ,
> मदान्धा रे येथें वसति करणे आण न मनीं,
> गजांच्या भ्रांतीनें प्रखर नखरांनीं गुरुशिला
> विदारोनी आहे बघ गिरिमधें सिंह निजला.

मोजक्या शब्दांत आणि सुबोध रीतीने भाषांतर करण्याच्या कामी हरिभाऊंचा कसा हातखंडा असे, याची साधारण कल्पना यावरून येणार आहे आणि हा श्लोक वयाच्या सतराव्या वर्षी हरिभाऊंनी केला ही गोष्ट लक्ष्यात ठेवण्यासारखी आहे. 'लॉंगफेलोच्या साम ऑफ लाईफचें "जीवितसार" या नावानें हरिभाऊंनीं जें कविताबद्ध भाषांतर केलें आहे त्यावरूनही त्याची काव्याचें भाषांतर करण्याची हातोटी उत्कृष्ट रीतीनें दिसून येते.

## शिष्यजनविलाप,

याच्या दुसऱ्या साली विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या निधनाचा अत्यंत शोचनीय व जनतेचीं हृदये दुःखित करणारा प्रसंग घडून आला, त्यावेळीं हरिभाऊंनीं " शिष्यजनविलाप " हें काव्य केलें. शास्त्रीबुवाची विद्वत्ता, त्यांच्या भाषेचा जोरकसपणा, त्यांचा देशहिततत्परता, पुण्यपत्तनांत त्यांनीं निर्माण

केलेल्या वेगवेगळ्या संस्था वगैरेंचे या काव्यांत फारच हृदयगम रीतीनें वर्णन केले आहे. काव्यांत उपयोजिलेले कित्येक अलंकार चांगल्या नाणावलेल्या कवीलाही भूषविण्यासारखे आहेत. त्यांची ही कविता अर्थात् त्याच्या नावाने प्रसिद्ध झाली नाहीं. पण काव्याचा प्रसाद व सरसता ही पाहून ते निर्माण करणाऱ्या विद्यार्थ्यांची सर्वजण प्रशंसा करूं लागले. शास्त्रीबुवांच्या मृत्यूबद्दल दुःख प्रदर्शित करण्याकरिता न्यू इंग्लिश स्कूलमध्यें सभा भरली, त्यावेळीं परलोकवासी गोपाळराव आगरकर यांनी या काव्यातील निवडक भाग सर्व विद्यार्थीजनाला वाचून दाखविला व असे काव्य निर्माण करणारे विद्यार्थी ज्या शिक्षणसंस्थेंत निपजतात त्या संस्थेचा भविष्यत्काळ खरोखरच उत्कर्षमय होणार अशी खूणगांठ बांधण्यास कांहीं हरकत नाहीं असे सद्गदित अंतःकरणानें उद्गार काढले. या पुस्तकाच्या बहुतेक प्रती विद्यार्थ्यांतच खपल्या आणि त्या अवघ्या दोनच महिन्यात खपल्या.

## अथ लावण्याची हतोटी.

याच सुमारास हरिभाऊ शाकुंतल वाचीत असत. त्यांत पांचव्या अंकात दुष्यंताचे तोंडी—

> स्त्रीणामशिक्षितपटुत्वममानुषीषु
> संदृश्यते किमुत याः प्रतिबोधवत्यः ।
> प्रागन्तरिक्षगमनात्स्वमपत्यजात-
> मन्यैर्द्विजैः परभृताः खलु पोषयन्ति ॥

असा श्लोक आहे. स्त्रियांची उपजत हुषारी पशुपक्ष्यांमध्येंसुद्धा दिसून येते, मग ती सुबुद्ध अशा मनुष्यप्राण्यानहि दिसून यावी यांत आश्चर्य तें काय ? हा या श्लोकाचा भावार्थ समजण्यांत येतो, पण केवळ एवढाच त्याचा अर्थ असता तर शकुंतलेला इतके राग येण्याचें कारण नव्हतें. तिने यानंतर राजाला जें उत्तर दिलें आहे तें राजाच्या या भाषणाने आपल्या दुःखावर डागण्या बसल्या या भावनेनें दिलें आहे. तेव्हां या श्लोकाचा जो उत्तान अर्थ दिसत आहे त्याहून वेगळा कांही अर्थ निघ शकेल की काय असा विचार येऊन हरिभाऊंचे चुलते अण्णासाहेब यांनीं आपल्या "मौंजेच्या चार घटका" या पुस्तकांत शाकुंतलाचें जें भाषांतर दिलें आहे, त्यांत त्यांनीं 'अमानुषीषु' या पदाचा, अप्सरांमध्यें किंवा देवांगनांमध्यें असाही अर्थ करतां येण्यासारखा आहे असें ध्वनित केलें आहे. हा

धागा घेऊन या श्लोकानें 'खाण तशी माती' असेंच दर्शविण्याचा दुष्यंताचा हेतु असणें कसें संभवनीय आहे हें हरिभाऊंनीं एका प्रसंगीं स्पष्ट केले. स्त्रियांचा उपजत चाणाक्षपणा अप्सरांमध्यें नेहमींच दिसून येतो, मग मेनकेसारख्या ज्या प्रमुख अप्सरा आहेत त्यांची गोष्ट कशाला पाहिजे. देवांच्या वेश्या (परभृताः) आपल्या अपत्यांचें ब्राह्मणांकडून संगोपन व्हावें अशी अंतरिक्षांत जाण्या पूर्वी तजवीज करितात, वगैरे या श्लोकाचा अर्थ त्यानी लावला व प्रोफेसर परशराम नारायण पाटणकर यांनी आपल्या शाकुंतलाच्या प्रस्तावनेंत तो विशेष मार्मिक आहे असे वाटल्यावरून दिला.

## विद्यार्थ्यांची गुरूवरील टीका.

हरिभाऊंना परीक्षेंत यश आलें नाहीं, तरी त्याचा अधिकार फार मोठा होता हे अल्पवयातच कसे निदर्शनास आलें याचे आतांपर्यंत काहीं मासले दाखविले. पण वस्तुतः त्याच्या लेखनक्रियेला त्यांच्या वयाच्या १४ व्या वर्षीच प्रारंभ झाला. इंग्रजी ४ थ्या इयत्तेत असतांनाच त्यानी " पांडुरंग हरि " या नावाच्या पुस्तकाचें बरेचसे भाषांतर केले होते. ज्या वयांत मुलाना वर्गांतील निबंध लिहिण्याचीही मारामार पडते त्या वयात हरिभाऊंच्या लेखनक्रियेस प्रारंभ व्हावा, ही गोष्ट वाङ्मयसाम्राज्यात पुढें जे त्यानी अद्वितीय स्थान मिळविलें याची सूचक नव्हती असें कोण म्हणेल ! प. वा. गोपाळराव आगरकर यानी केलेलें हॅम्लेटचें भाषांतर विकारविलसित या नावानें प्रसिद्ध झालें. त्यावर निबंध-चंद्रिका मासिकात हरिभाऊंनी सन १८८२ साली एक टीकात्मक लेख लिहिला. यावेळी हरिभाऊं हे विद्यार्थीच होते. आपल्या विद्यार्थ्यानें आपल्या पुस्तकावर ७२ पृष्ठाचा एक टीकात्मक लेख लिहिला हे पाहून आगरकरांना अर्थातच परमावधीचे कौतुक वाटले आणि त्याबद्दल त्यानी हरिभाऊंची वर्गां-तील सर्व विद्यार्थ्यांसमोर प्रशंसाही केली. कै. नारायण बापूजी कानिटकर यांच्या रोमिओ ॲण्ड ज्यूलिएट या नाटकाच्या भाषांतरावरही त्यानीं विस्तृत व सांगोपांग टीका केली होती.

हरिभाऊंचा शेक्स्पिअरचा व्यासंग विशेष असे आणि त्या व्यासंगाला १७।१८ वर्षांच्या अल्प वयातच साधारण प्रगल्भ स्वरूप आले होतें हें वरील हकीकती-वरून समजून येईलच. शेक्स्पिअर हा त्याचा आवडता कवि होता. शेक्स्पि-अरचीं नाटकें व त्यावरील विद्वान् ग्रंथकारांचीं परीक्षणे यांचा त्यांनी फारच

चागला अभ्यास केला होता. शेक्स्पिअरचें एक विस्तृत परीक्षण करावें असा विचार ठरवून त्यानीं जे थोडे लेख लिहिले ते चित्रमयजगतांत प्रसिद्धही झाले आहेत, पण पुढें तें काम तसेंच अपुरें राहिलें. हें परीक्षण समाप्त करण्यास हरिभाऊ वाचले असते तर त्यामुळें महाराष्ट्रवाङ्मयांत उत्कृष्ट प्रकारची भर पडली असती यात संशय नाही. शेक्स्पिअरच्या सप्तपद्यांचेंही ( सॉनेटस् ) भाषांतर त्यानी सुरूं केलें होते. त्याचा सरासरी तृतीयांश भाग लिहूनही तयार झाला आहे. तेवढा जरी प्रसिद्ध झाला तरी कवि या दृष्टीनें शेक्स्पिअरची योग्यता केवढी मोठी होती हे मराठी वाचकांच्या लक्षात आल्यावाचून राहणार नाही.

## युनिव्हर्सिटीचे परीक्षक.

हरिभाऊंना परीक्षेच्या कामात यश आले नाही तरी पण त्याचा विद्याव्यासंग अखंडित रीतीने चालल्यामुळे युनिव्हर्सिटीच्या पदवीची उणीव त्याना केव्हांही भासली नाही. किंबहुना सतत परिशीलनानें त्याना एवढा अधिकार आला होता की, पदवी मिळविण्याच्या दृष्टीने ज्या युनिव्हर्सिटीत प्रवेश मिळता मिळना त्याना मारामार झाली त्याच युनिव्हर्सिटीनें आपल्या अभ्यासप्रणालीतील अत्युच्च परीक्षेला त्याना सतत दहा वर्षे परीक्षक नेमून त्याच्याबद्दल आपला आदर व्यक्त केला. युनिव्हर्सिटीच्या कामाची दिशा ठरविणाऱ्या सेनेटचेही ते सभासद होते. विल्सन फायलॉलॉजिकल लेक्चररशिपची जी जागा प्रायः पदवीधराचे वाट्याला यावयाची तीही हरिभाऊंना स. १९१५ मध्ये मिळाली होती. त्याची ही व्याख्यानें झाली त्यावेळेस श्रोत्यांची नेहमीच्या मानाने बरीच गर्दी जमत असे. युनिव्हर्सिटीच्या पदवीची उपाधी नसताही केवळ आपल्या अंगच्या पात्रतेने विद्वानांच्या समाजात प्रमुखस्थान मिळविल्याची हरिभाऊंच्यासारखी उदाहरणें कोठेंही झालें तरी थोडीच असावयाची. पुढील आयुष्यक्रमांत काय करावयाचें हें ज्याचें आधी ठरलेलें असतें असे विद्यार्थी फारच थोडे सापडतील. हरिभाऊ अशा थोड्या विद्यार्थ्यांपैकीच एक होते.

## आयुष्यक्रमाचें ध्येय.

" शिष्यजनविलाप " या काव्याच्या शेवटच्या म्हणजे ८९ व्या श्लोकात त्यानी आपलें हे ध्येय स्पष्टपणें सांगितलें आहे. शास्त्रीबुवांनीं ज्या निरनिराळ्या शिक्षणप्रसारक संस्था स्थापन केल्या त्या चालविणें नूतन पिढीचें कसे कर्तव्य आहे हें सांगताना हरिभाऊ या काव्यांत म्हणतात:—

युष्मच्छिक्षणवारिधीमधिं अम्ही जे मग्नसे राहिलों,
वैयर्थ्या जरि जाउं देउंची तया, जन्मा कशाला अलों ?
जो जो कृत्यसमूह या पुरिमधें धैर्यें तुवां स्थापिला,
तो तो चालविण्यास जन्म खरचूं सारा अम्ही आपुला

शास्त्रीबुवानीं व त्यांच्या सहकारी मित्रानीं जें कार्य आरंभिलें होतें तें आम्ही अव्याहत पुढे चालवूं, ही जी हरिभाऊंनी या श्लोकांत शिष्यजनांच्या वतीनें प्रतिज्ञा केली आहे ती केवळ काव्यसृष्टीतच न ठेविता प्रत्यक्ष व्यवहारांतही त्यांनीं तिची पूर्तता केली. विद्यालय, मुद्रणालय व पुस्तकालय हें शिक्षणप्रसाराचे आधुनिक कालांतील प्रस्थानत्रयच होय. शास्त्रीबुवानीं या तिन्ही साधनांचा आश्रय करून समाजांत ज्ञानप्रसार करण्याचा संकल्प केला. हरिभाऊंनींही आपल्या आयुष्यक्रमांत याच कार्याची परिपूर्ती करण्यास अगदी अल्प वयांतच प्रारंभ करून, तो अव्याहत ३०।३२ वर्षांच्या परिश्रमानें उत्कृष्ट रीतीनें कसा तडीस नेला, याची त्यांच्या या चरित्रावरून वाचकांना निदान स्थूल कल्पना येईल अशी आशा आहे.

## पुनः तोच निकाल झाला !

हरिभाऊंनीं एलएल. बी. व्हावें निदान वकिलीची परीक्षा तरी द्यावी अशी त्यांच्या चुलत्यांची व इतर आप्तेष्टांची फार इच्छा होती. पण पुढें, जें कधींच घडावयाचें नव्हते तें कसें घडून येणार ! अण्णासाहेबांच्या इच्छेप्रमाणें हरिभाऊंना वकील होतां आलें नाही. पण पुढें त्यांनी जी समाजाची वकिली करून त्यांत स्थित्यंतर घडवून आणण्याचा यशस्वी प्रयत्न केला तो पहातां, ते केवळ पैशाकरिता भाडोत्री वकील झाले नाहींत, हें सुदैवच समजलें पाहिजे. त्यांचे चुलते अण्णासाहेब यांचें हरिभाऊंवर पुत्रवत् प्रेम असे. पण हरिभाऊंचा विद्याभ्यास नीट रीतीनें तडीस गेला नाहीं याबद्दल त्यांचीही हरिभाऊंवर थोडीशी नाराजी झाली. ही नाराजी अर्थातच प्रेममूलक होती. वकिली नाहीं तर नाही, पण मुलाला कांहीं तरी धंदा लावून द्यावा या हेतूनें अण्णासाहेबांनीं त्यांना मुंबईस नेलें व तेथें जगदीश्वर प्रेसमध्यें छापखान्याचें काम शिकण्यास ठेविलें. पण शिकणें म्हटलें म्हणजे त्याला कांहीं तरी नियंत्रण व शिस्त लागते. त्यास लोकांनीं घालून दिलेल्या मार्गानें निमूटपणें जाण्यासारखा आज्ञाधारकपणा किंबहुना अंधविश्वासही लागतो. त्याचें हरिभाऊंच्या ठिकाणीं असावें

तसें वास्तव्य नसल्यामुळें याही ठिकाणीं दुसऱ्यानें ठरविलेल्या धंद्याची वेसण आपल्या नाकात अडकवून घेण्याची त्यानी चुकवाचुकव केली आणि अखेर त्यांच्या पूर्वपरंपरेप्रमाणेच ते या छापखान्याच्या परीक्षेंतही नापास झाले ! खिळे जोडणें, मशीनवर जाण्यास फर्मा तयार करणें, मशीनची माहिती मिळविणें, फर्मा जुळविणें, कागद मोडणें, छपाईचा आकार ठरविणे वगैरे छापखान्या संबंधातल्या सर्व गोष्टीची माहिती पुढें आनंदाश्रमातील पुस्तकप्रकाशनाचें काम चालविण्यासंबंधात हरिभाऊंना उपयोगी पडावी या हेतूनेंच अण्णासाहेबानी त्याना मुंबईत जगदीश्वर छापखान्यात ठेविलें होते. पण त्याचा परिणाम वर सांगितल्याप्रमाणेच झाला. आपल्या प्रिय भगिनी श्रीमती काशीताई कानिटकर व प्रिय मित्र रा० कृष्णाजी केशव गोखले यांना त्यानी त्या वेळी पत्रं लिहिली त्यात, " हरि नारायण आपटे व परीक्षा याचे अत्यंत वाकडें कसे आहे हें सुप्रसिद्धच आहे. त्याप्रमाणेच आम्ही येथील परीक्षेंतही नापास झालों ! " अशा आशयाचा मजकूर होता.

## हरिभाऊंचा बाणेदारपणा.

जगदीश्वर प्रेसमधील शिक्षणाचा अशा तऱ्हेने निकाल लागल्यानंतर अण्णासाहेबानी "हरिभाऊंस" एक पुस्तकप्रकाशनाची कपनी काढण्यास सांगितलें. पण हरिभाऊंनी ' माझ्यानें ते काम होणार नाहीं. व त्यात नष्ट येईल असे स्पष्ट सांगितलें. पुढे त्यानी करमणूक काढली. तेव्हा अण्णासाहेबानी त्यास एक पत्र पाठवून खडखडीत सांगितलें की 'तूं जर माझी कोणतीच गोष्ट ऐकत नाहीस तर तुला मजकडून एक कपर्दीकसुद्धा मिळणार नाही. ' या पत्राचे उत्तर हरिभाऊंनीही तसेंच लिहिले, व अण्णासाहेबास कळविलें की, " मी तुमच्या पैशाची केव्हाच आशा केली नाहीं, तुमचा स्वकष्टार्जित पैसा आहे. तुम्ही त्याचे मालक आहात, त्यावर माझा डोळा स्वप्नांत सुद्धा नव्हता व आताही नाही. " खरोखरीच हा प्रसंग मोठा आणीबाणीचा होता. " दुसऱ्याचें म्हणणें अगदीं निरुपयोगी, किंबहुना दुसऱ्याचे म्हणणें मुळीच नसले पाहिजे " अशी भयंकर दिव्यातील दादासाहेबाच्याप्रमाणे अण्णासाहेबाची प्रवृत्ति नसल्यामुळे त्यांनी हा वाद विकोपास न जाऊं देता थोडक्यातच मिळतें घेतलें व हरिभाऊंची आनंदाश्रमावर स्थापना केली.

———.

# प्रकरण चवथें.

## मधली स्थिति.

### मनोज्ञ मन्वंतराचा पाया.

पुढे आपण उत्कृष्ट लेखक होणार याची स्पष्ट सूचना देणारं। हरिभाऊंच्या हातून जे लहान सहान प्रयत्न झाले त्याची साधारण माहिती यापूर्वी दिलीच आहे. हे सर्व प्रयत्न त्याच्या विशी एकविशीत झालेले. यात सर्वांत श्रेष्ठ व हरिभाऊच्या अकाल परिपक्वतेची स्पष्ट जाणीव उत्पन्न करून देणारा त्याचा प्रयत्न म्हटला म्हणजे त्याची 'मधली स्थिति' ही कादंबरी होय. या कादंबरीची हकीकत मोठी मनोरंजक आहे. हें पुस्तक १८८५ साली प्रसिद्ध झालें. पण हरिभाऊच्या कल्पनेने ते यापूर्वीच एकदोन वर्ष लिहून निघाले असावे. या वेळी हरिभाऊंचा रेनॉल्डसच्या कादंबऱ्याचा विशेष व्यासंग असे. प्रथम वयात शास्त्रीबुवा हेच त्याचे आदर्श होते. आणि शास्त्रीबुवानी हवा तो विचार सुगम रीतीने प्रदर्शित करण्याचें मराठी भाषेस सामर्थ्य आणले ते रेनॉल्डसच्या वाचनामुळेंच होय, असा त्या वेळी लोकप्रवाद असल्यामुळे हरिभाऊही या कादंबऱ्या वाचीत असत. यामुळे त्याच्या डोळ्यावर जो परिणाम झाला तो त्याना जन्मभर भोगावा लागला. रेनॉल्डसची 'ओल्ड लंडन' या नावाची एक कादंबरी आहे. तिलाच मराठी पेहराव चढवून ती महाराष्ट्रवाचकापुढें ठेवावी असा हरिभाऊंचा प्रथम मनोदय होता. त्याप्रमाणे या पुस्तकाचें पहिलें प्रकरण भाषांतरमय आहे. पण परक्याच्या कल्पनाशक्तीवर चरितार्थ चालविणे मोठेंसें भूषणावह नाही असें वाटूनच की काय, हरिभाऊंनी तो नाद सोडून दिला व या पुस्तकाच्या दुसऱ्याच प्रकरणापासून स्वतंत्र रीतीने ग्रंथरचना करण्यास सुरवात केली. ग्रंथाची कांहि प्रकरणें तयार झाली, ती त्यांनीं आपल्या कांहीं मित्राना दाखविलीं. ती पाहून त्याचे कित्येक स्नेही अर्थांतच चकित होऊन गेले. मराठी भाषेंतील एका नवीन पण, मनोज्ञ मन्वंतराचा हा पायाच होय असें त्यांना वाटले. पण हे पुस्तक छापून कसें निघावें ही विवंचना सर्वांपुढें येऊन

उभी राहिली शेवटी त्याच्या एका स्नेह्यानें येथील पुणेवैभवाचे मालक प. वा. शंकरराव केळकर यांना त्याबद्दल विचारलें. रा. केळकर हे जुन्या मताचे कट्टे अभिमानी होते. या पुस्तकाचा प्रतिपाद्यविषय सुधारकी मताचा आहे हे समजूनही त्यानीं हें पुस्तक पुणेवैभवात छापण्याचे कबूल केले. ही एकच गोष्ट हरिभाऊंच्या रचनासौष्ठवाची साक्ष पटविते. रा. केळकर यांनी कबूल केल्याप्रमाणे हे पुस्तक दरमहा पुणेवैभवास जोडलेल्या एका जादा पुरवणीत खंडशः प्रसिद्ध होऊं लागलें.

## कादंबऱ्यांचे उद्दिष्ट.

पहिले प्रकरण ज्या अंकात प्रसिद्ध झाले त्या अंकातच 'कादंबऱ्याचे उद्दिष्ट' या मथळ्याखाली एक सुंदर अग्रलेख प्रसिद्ध झाला. कादंबऱ्याचा उद्देश मनोरंजन हा आहेच, पण त्याबरोबरच समाजाला सद्बोध करून त्यास सन्मार्गास लावण्याचें सत्कार्य कादंबऱ्याच्या हातून होणे जरूर आहे, असें या लेखात प्रतिपादन करण्यात आलें होते. हा लेख हरिभाऊंचाच होता. हरिभाऊंनी या लेखात निर्दिशित केलेला कादंबऱ्याचा उद्देश त्यांच्या कादंबऱ्यांनी किती उत्कृष्ट तऱ्हेने सफल केला हें महाराष्ट्रवाचक जाणतच आहेत. साधारण कादंबरी म्हटली की ते हलक्या दर्जाचें वाङ्मय, म्हणून लोकानी नाकें मुरडलीच म्हणून समजावे. पण हरिभाऊंची ही कादंबरी प्रसिद्ध होऊं लागली तेव्हा समाजात खळबळ उडवून देण्याचे कामी अशा प्रकारचे वाङ्मय किती सामर्थ्यवान् असते हे लोकांच्या निदर्शनास आले.

मधल्या स्थितीची दोन प्रकरणे प्रकाशित होताच पुण्याचेंच नव्हे, तर सर्व महाराष्ट्रीय वाङ्मयाचे वैभव वाढविणारा हा रचनाकर्ता कोण, हें जाणण्याची सबुद्ध समाजात तीव्र लालसा उत्पन्न व्हावी हे स्वाभाविकच होतें. या पुस्तकाचा कर्ता कोण हें काही दिवस अज्ञातच होतें. प. वा. शंकर मोरो रानडे, रावबहादूर काशिनाथ नारायण साने, रा. ब. विष्णु मोरेश्वर महाजनी वगैरे गृहस्थांनीं पुणेवैभवकर्त्याला पत्रें लिहून "मधली स्थिति" निर्माण करणाराची मनःपूर्वक प्रशंसा केली. प. वा. शंकर मोरोंनी तर आपल्या पत्रात असे लिहिलें होतें की, या कादंबरीचे प्रकाशित प्रकरण वाचून झाल्यानंतर, पुढचें प्रकरण हाती केव्हा येईल, असें मनाला वाटूं लागते. हरिभाऊंना लिहिण्याची स्फूर्ती प्रथम ज्यांच्यामुळें झाली त्यांत शंकर मोरो रानडे यांना अग्रस्थान दिलें पाहिजे. त्यांच्या

नाट्यकथार्णवानेंच हरिभाऊंच्यामध्यें लेखनप्रवृत्ति उत्पन्न केली. अशा गृहस्थांच्या तोंडून आपल्या कृतीची प्रशंसा झालेली पाहून हरिभाऊंना अर्थात धन्यताच वाटली असली पाहिजे या कादंबरीचे जनकत्व हरिभाऊंकडेच आहे ही गोष्ट बाहेर आली त्यावेळी त्यांच्याबद्दल पूर्वीच ज्यांच्या मनांत आदर होता, त्याचा तो दुणावला व ज्यांना या पुस्तकाच्या योगानेंच हरिभाऊंची माहिती झाली त्यांच्या मनांत तो उत्पन्न झाला.

## प्रतिभेचा प्रभाव.

कादंबऱ्यांच्या मालिकेंतील हरिभाऊंचें हे पहिलेच पुस्तक. अगदी लहान वयांत लिहिलेले. चागल्यः अनुभवी व चाणाक्ष माणसासही मनुष्यस्वभावाचे जे कप्पे सांपडणें कठीण ते हरिभाऊंना अगदी अल्पवयात कसे उघडे करून दाखवितां आले असा कित्येकापुढे प्रश्न उभा राहील आणि त्याचे एकच उत्तर द्यावयाचें म्हणजे हा सर्व प्रतिभेचा प्रभाव होय. या पुस्तकात वाचकानी नमूद करून ठेवण्यासारखे किंबहुना पाठ करण्यासारखे असे वर्णनात्मक किंवा विचारात्मक अनेक उतारे सांपडतील. याचें कारण हे पुस्तक अगदी तारुण्यावस्थेत लिहिलेलें आहे, हेच असावे. लहानपणींच हातात पुष्कळ पैसा आला म्हणजे तो किती खर्च करू आणि कसा खर्च करूं असें मनुष्यास होऊं लागतें, त्याप्रमाणेंच अकालपरिपक्व अशी प्रतिभा ज्यास लाभते त्या ग्रंथकाराची गोष्ट होय. त्यांच्या पहिल्या पहिल्या ग्रंथातून सुविचाराचे फवारे, कल्पनेच्या भराऱ्या व वर्णनाच्या बहारी यांची विशेष गर्दी उसळून गेलेली दिसते. एखाद्या सभेस किंवा सार्वजनिक समारंभास, समाजास अपरिचित अशा माणसास प्रथमच जावयाचे झाल्यास, तो जसा अगदी व्यवस्थित व नीटनेटका पोषाक करून जातो व सर्वांचें लक्ष आपल्याकडे जाऊन आपल्याला मानाची जागा मिळावी म्हणून खटपट करीत असतो; त्याप्रमाणेंच तरुण ग्रंथकाराचीही स्थिति असते. आपल्या पुस्तकाचें विद्वान् लोकाकडून योग्य रीतीनें गुणग्रहण व्हावें या इच्छेने तो साहाजिकच आपल्या शक्तींचें त्यांत सारसर्वस्व ओतण्याचा कसा प्रयत्न करितो, याचा हें पुस्तक एक मासला होय, अशी वाचकाची खात्री झाल्यावांचून रहाणार नाही.

हरिभाऊंची सूक्ष्म निरीक्षणशक्ति, कादंबऱ्यातील भूमिकांशी तादात्म्य पावण्याची त्यांची हातोटी, व सर्व कथानक जणुं काय आपल्या समोरच चाललें

आहे, किंबहुना आपण स्वतः त्या कथानकांतीलच एक घटक आहों असा आभास उत्पन्न करण्याचें त्यांचें अप्रतिम कौशल्य त्यांच्या या अगदी तारुण्यात लिहिलेल्या कादंबरीतही चांगल्या रीतीनें दिसून येते.

## डग्गा व बाह्या.

या पुस्तकात त्यांनी वेश्येच्या घराचें जें वर्णन केलें आहे ते इतकं हुबेहूब साधले कीं, ते पाहून हा माणूस अष्टौप्रहर वेश्येच्या घरींच काळ घालविणारा असला पाहिजे, असे येथील एका प्रमुख वेश्येनें त्या वेळीं उद्गार काढले होते. याच प्रकरणात एका बैठकीचें वर्णन देताना, त्या ठिकाणीं बाह्या आणि डग्गा होता, असें हरिभाऊंनी म्हटलें आहे. ही त्यांची अर्थातच चूक होती. डग्यासच बाह्या म्हणतात. डग्गा आणि तबला असें हरिभाऊंना म्हणावयाचें होतें त्या ठिकाणी त्यानी वरीलप्रमाणें चूक केली आहे, ही गोष्टही त्या वेश्येच्या निदर्शनास आली. दुसऱ्याकडून माहिती मिळवूनच यानें हें वर्णन लिहिलें आहे ही गोष्ट यावरून त्या चाणाक्ष वेश्येनें ओळखली व हरिभाऊंबद्दल तिचा पहिला संशय अर्थातच नाहींसा झाला.

## पतित स्त्रियांबद्दलही सदयता.

हरिभाऊंचें मनुष्यस्वभावाचें अवलोकन सूक्ष्म व मोठें मार्मिक होतें. मनुष्यस्वभावाचे दोषहि ते मोठ्या रसभरित रीतीने वर्णन करीत. पण यांत त्यांची उपहासबुद्धि केव्हांही नसे. त्यांच्या वर्णनाच्या मुळाशी नेहमी सदयता वास करीत असे, हाच त्यांच्या कादंबऱ्यातील विशेष होय. वेश्या झाल्या तरी त्या सर्वस्वी तिरस्करणीय नसून त्यांच्याही परावर्तनाचे प्रयत्न करणें जरूर आहे असेंच त्यांना वाटे. आणि या प्रश्नाचें एका कादंबरींत पृथक्करण करून त्यावर उपायही सुचविण्याचा हरिभाऊंचा विचार होता. या प्रश्नाप्रीत्यर्थ त्यांची स्वतंत्र कादंबरी झाली नाहीं तरी कर्मयोगामध्यें नर्मदेची भूमिका रंगवून पतित स्त्रियांचाही उद्धार करणें कसें अवश्य आहे, याची त्यानीं रूपरेषा दर्शविली आहे. भावानंदाच्या मठांत असलेल्या संस्थासमुदायांपैकीं पतित स्त्रियांच्या उद्धाराकरितांही एक नमुनेदार संस्था चालली होती. त्या संस्थेंतच शेवटीं नर्मदेला जावें लागलें. स्त्रिया पतित होतात त्या प्रायः पुरुषांच्याच फुसलावणीनें होतात. अशा स्थितींत ज्यांना कृतकर्माबद्दल खरोखरच पश्चात्ताप होत आहे, अशांना शिष्टसमाजांत परत येण्याचा मार्ग मोकळा कां राहूं नये, हा प्रश्नच

नर्मदेच्या भूमिकेवरून हरिभाऊंनी उपस्थित केला आहे. यावरून हरिभाऊंच्या सदयतेचा व सामाजिक सुधारणेच्या संकल्पित कार्यांचा परिघ किती पल्लेदार होता हें दिसून येतें.

## प्रत्यक्ष घडलेलें उदाहरण.

त्यांचे चुलते अण्णासाहेब यांच्या पत्नी वारल्यानंतरचा त्यांचा आयुष्यक्रम कशा प्रकारचा होता याची ओझरती सूचना वाचकांना पहिल्या प्रकरणावरून मिळाली असेलच. अण्णासाहेबांना अपत्य नसल्यामुळे त्यांची सर्व इस्टेट हरिभाऊंनाच मिळणार ही गोष्ट साधारण ठरल्यासारखीच होती. अर्थात् त्यांच्याजवळ असलेल्या बाईंना हरिभाऊंचे मुंबईस जाणे येणें तितकें खपत नसे. तरी पण त्या बाई मोठ्या हुषार व चाणाक्ष होत्या. हरिभाऊ हा साधारण माणसांपैकी नव्हे, हें त्यांनीही ओळखलें. अशा हुषार बाईवर असला अवनत आयुष्यक्रम घालविण्याचा प्रसंग यावा याबद्दल हरिभाऊंनाही वाईट वाटे. त्यांनी सहज बोलण्याचालण्यांत निघालेल्या इतर गोष्टींबरोबर बाईजवळ याबद्दलचें दिग्दर्शनही केलें. त्याचा परिणाम बाईंच्या मनावर तत्काळ घडला नसला तरी तेवढ्यानेंच त्यांच्या ठिकाणी पश्चात्तापाचें बीजारोपण झाल्याशिवाय राहिलें नाही. पुढें बाईंची त्याच आयुष्यक्रमांत अनेक परिवर्तनें होऊन बऱ्याच वर्षांनी त्या पुण्यास रहावयास आल्या. त्या वेळी हरिभाऊंच्या उपदेशाची आठवण होऊन, आपल्या द्रव्याचा कांही सत्कार्यासाठी उपयोग करावा अशी त्यांच्या ठिकाणी इच्छा उत्पन्न झाली. तेव्हा त्यांनीं हरिभाऊंच्याच सल्ल्यानें येथील एका उपयुक्त संस्थेस दहा हजार रुपयांची देणगी दिली. ही देणगी स्वीकारावी किंवा न स्वीकारावी याबद्दल संस्थेच्या चालकांना बराच विचार पडला. पण कृतकर्माबद्दल पश्चात्ताप झाला असतांही वेश्येसारख्या एका विशिष्ट वर्गास आपली उन्नति करण्याचें द्वार समाजाने का बंद ठेवावें, ही विचारसरणी हरिभाऊंनीं चालकांपुढें मांडली व अखेर बाईंच्या इच्छेप्रमाणे त्यांची देणगी स्वीकारली गेली.

आपल्या समाजांत स्त्रिया आधींच परावश. त्यांतही नवरा दुर्व्यसनी असला म्हणजे त्यांचे हाल कसे होतात हें या पुस्तकांत हरिभाऊंनी दाखविलें आहे. दारूच्या व्यसनामुळें मनुष्याच्या द्रव्याची हानि होते, शरीराची हानि होते, लौकिकाची हानि होते वगैरे त्यापासून होणाऱ्या दुष्परिणामास प्राधान्य न देतां अशा व्यसनी माणसाच्या बायकोस किती त्रास होतो, प्रसंगीं तिचा जन्मही वायां जाण्याची कशी भीति

असते हेंच वाचकाच्या मनावर ठसविण्याचा हरिभाऊंचा हेतु दिसतो. याचें कारण दुसरें कांही नसून स्त्रियांबद्दलचें त्यांचे दाक्षिण्य, त्यांच्या हिताबद्दलची त्यांची कळकळ, त्यांच्यावर होत असलेल्या अन्यायाबद्दलचा त्यांना वाटणारा द्वेष हीच होत. स्त्रियांची आधीच हीन असलेली स्थिति अधिकच हीनतर अवस्थेत समाजापुढे येऊन समाजास त्याच्याबद्दल तत्काळ कळवळा उत्पन्न व्हावा हाच मद्यपी लोक निवडून त्याचे चरित्र आपल्या कादंबरीत ग्रथित करण्याचा हरिभाऊंचा उद्देश स्पष्ट दिसतो. आणि तेंच कार्य या कादंबरीनें केलेलें आहे.

## दुर्व्यसनी लोकांचा अड्डा.

' मधली स्थिति ' या कादंबरीचे कथानक हरिभाऊंनीं कसें जमविलें, याचें पुष्कळांना गूढ पडेल. पण कादंबऱ्यांत वर्णन केलेली स्थिति त्यानी आपल्या कल्पनाशक्तीने रंगविलेली असली तरी तिचे मूळ स्वरूप त्यानी वस्तुसृष्टीत पाहिलें होतें. येथें शनीच्या पाराजवळ दुर्व्यसनी लोकांचा एक अड्डा होता, तेथें हरिभाऊंचें जाणें येणें असे. हरिभाऊंसारखा सुशिक्षित मनुष्य आपल्या कंपनीत असणे हा या लोकांना मोठेपणाच वाटे. त्यांतील सर्व लोक हरिभाऊना आदरानें वागवीत. प्रथम प्रथम हरिभाऊंच्यादेखत ते आपल्या दुर्व्यसनाचे प्रकार करण्यास लाजत असत. परंतु पुढें परिचयानें भीड चेंपत गेल्यामुळें हरिभाऊंस साक्ष ठेवूनही ते बेलाशक बाटल्या तोंडाला लावू लागले ! हरिभाऊ हे अर्थातच केवळ निरीक्षकाचेंच काम करीत असत. ते असल्या प्रकारापासून तेव्हांच काय, पण पुढेंही आजन्म निर्लेप असत. विनायकराव, गोविंदराव वगैरे पात्रें याच आखाड्यातील होत. या कादंबरीतील कित्येक भूमिकाचे रूपवर्णनही या आखाड्यातील कित्येक मनुष्याशी तंतोतंत जमते असे कित्येक माहितगार माणसें सांगतात.

## सद्वर्तनाचा खंबीर पाया.

मधली स्थिति प्रसिद्ध होऊं लागताच हरिभाऊ कांही भलत्याच नादाला लागले नसतील ना ? अशी कित्येकांना शंका येऊं लागली. प्रत्यक्ष त्यांचे चुलते अण्णासाहेब यांचेंही मन हरिभाऊंच्यासंबंधाने क्षणैक संशयग्रस्त झालें; पण यासंबंधानें बोलणे निघालें असतांना रा. ब. विष्णु मोरेश्वर महाजनी म्हणाले, " मुलाचा अधिकार मोठा आहे. त्याच्याबद्दल असला भलता संशय घेऊ

नका. दुर्वृत्त लोकाना सुमार्गावर आणण्याकरितांच ज्याचा जन्म ते स्वतः दुर्मार्गी कधीही होत नसतात." हरिभाऊंच्या यानंतरच्या कामगिरीनें हे सर्व संशयपटल आपोआपच दूर झाले. हरिभाऊ लहानपणापासूनच स्वतंत्र असत. वडील नोकरीच्या निमित्तानें बाहेरगावीं असणार, चुलत्याचें वास्तव्य वकिलीच्या धंद्याच्या निमित्तानें मुंबईस असणार, अर्थात् त्यांच्या तरुण वयांत त्यांना दाबतें दडपतें कोणीही नव्हते. कोणत्या मंडळीत जावें आणि कोणत्या मंडळीत जाऊं नये याचा विधिनिषेध हरिभाऊंना नव्हता. एखादी सुगरण गृहिणी, प्रपंचाला लागणारी जी वस्तू जेथें सापडेल तेथून ती पैदा करून जशी प्रपंचाची ठाकठिकी बसविते, त्याप्रमाणेंच आपल्या सामाजिक कादंबऱ्याचा प्रपंच उभारण्यास निरनिराळ्या मनोरचना, निरनिराळे स्वभाव व निरनिराळ्या अभिरुचि असलेल्या व्यक्तींचें निरीक्षण करण्याचें हरिभाऊंचें काम अगदी बालपणापासून सुरू झालें होतें. या महत्त्वाच्या कार्यामध्ये ते इतके निमग्न झाले होते की, दुर्व्यसनाचा विचार त्याच्या मनांत येण्यास वावच नव्हती! तरुणपणांत बिघडण्याच्या जितक्या म्हणून सोयी असतात त्या सर्व त्याना अनुकूल होत्या; पण तितक्यांतूनही ते धुतल्या तांदळाप्रमाणें शुद्ध राहिले, इतकेंच नव्हे, तर इतरांचीही मनें दुर्वर्तनापासून परावृत्त करण्याचा त्यांनीं परिणामकारक रीतीनें प्रयत्न केला. यावरून त्याचा सद्गुणाचा पाया किती खंबीर होता हें कोणासही समजून येण्यासारखें आहे.

## स्थितिवाचक कीं कालवाचक?

'मधली स्थिति' या नांवावरून हरिभाऊंना खालची स्थिति व वरची स्थिति या दोन कादंबऱ्या लिहावयाच्या असाव्यात, असा स्वाभाविकच तर्क होतो आणि तो खराही आहे. वरच्या स्थितीतील म्हणजे जहागीरदार, इनामदार, वगैरे लोक व खालच्या स्थितींतील म्हणजे अज्ञानपंकात निमग्न झालेले अगदीं निकृष्ट स्थितीतील लोक याना अनुलक्षून कथानकाची रचना करण्याचा त्याचा उद्देश असावा असे वाटते. 'जग हें असें आहे' या कादंबरीत खुपकाबाद संस्थानाचें त्यांनीं जें वर्णन दिलें आहे ते या हेतूच्या सिद्ध्यर्थच होय. महाराष्ट्रांतील संस्थानांची ज्याना माहीत आहे त्याना हें जुनाट संस्थान कोणतें असावें हें चटकन समजून येणार आहे! 'मी' प्रकरण ४१ मध्येंहि त्यांनीं श्रीमंताच्या परवशतेचें वर्णन केलें आहे. दक्षिण आफ्रिकेतील हिंदी लोकाच्या स्थितीवर एखादें कथा-

नक रचावें असा त्यांचा विचार होता. कदाचित् हें कथानक खालच्या स्थितींतील लोकांची हवाल दर्शविणारें झालें असते. " मधली स्थिति " हे शब्द कालवाचक आहेत किंवा स्थितिवाचक आहेत असा संशय येणें स्वाभाविकच आहे. हरिभाऊंनीं ते शब्द दुसऱ्या अर्थी वापरले होते. पण माझे मित्र रा. वाग्भट नारायण देशपांडे म्हणतात त्याप्रमाणे, " मधली स्थिति म्हणजे इंग्रजी शिक्षणाशी आमचा संबंध येण्यापूर्वीची स्थिति व त्या शिक्षणाने आमची मनें सुसंस्कृत होऊन आमच्या स्थितीची जाणीव होऊन स्वोन्नतीचे विचार सुशिक्षिताच्या डोक्यांत येऊं लागले ही आजची स्थिति " असाही अर्थ करणे सयुक्तिक होईल. हरिभाऊंच्या कादंबऱ्याची यापुढें जी परिणति झाली आहे ती पहाता हाच अर्थ खरा दिसतो. रा. वाग्भट नारायण देशपांडे याचा " कै. हरि नारायण आपटे यांच्या सामाजिक कादंबऱ्या " हा जो निबंध नुकताच प्रसिद्ध झाला आहे तो हरिभाऊंच्या कादंबऱ्यांची मांडणी कोणत्या धर्तीवर आहे हें समजण्यास चांगला सहाय्यभूत होईल असें वाटतें. हरिभाऊंच्या कादंबऱ्याचें त्यांनीं विशेष काळजीपूर्वक कसे अध्ययन केलेलें आहे हें, त्याचा हा निबंध वाचला असता, कोणाच्याही लक्षात आल्यावांचून रहाणार नाही.

## स्त्रियांच्या उन्नतीकरितां झटेन.

मधल्या स्थितीनंतर हरिभाऊंची दुसरी कादंबरी म्हणजे गणपतराव ही होय. ही कादंबरी मनोरंजन आणि निबंधचंद्रिका या मासिकाच्या १८८७ व १८८८ सालात प्रसिद्ध झाली आहे. तिची केवळ १८ प्रकरणेच होऊन ती तशीच अपूर्ण स्थितीत राहिली. "विष्णुपंत व यमुना यांचें प्रेमळ चरित्र गाण्याचे माझ्या मनात फार आहे, तेव्हां त्याचे तें चरित्र दुसऱ्या ठिकाणी गात आहे, हे येथें सांगून ठेवूं नको काय? असें हरिभाऊंनी मधल्या स्थितीच्या अखेरीस आश्वासन देऊन ठेविले. याप्रमाणें या दोन्ही भूमिका गणपतराव कादंबरीत आलेल्या आहेत. आपल्या समाजांतील स्त्रियांची परवशता काढून टाकून त्यांची स्थिति सुधारल्याखेरीज आपली उन्नति केव्हांहि होणार नाहीं. या विचाराचें काहूर गणपतरावासारख्या सुशीक्षित व प्रगल्भ विचाराच्या माणसाच्या मनांत एकसारखें कसें उडून गेलें आहे याचे वर्णन हरिभाऊंनी या कादंबरीत केलें आहे. स्त्रियांच्या परवशतेसंबंधाचे विचार गणपतरावाच्या मनास सुचले ते मिलच्या ग्रंथाच्या वाचनानेच होत. " मिलसाहेब आपण माझ्या मनाला जितकें उदात्तत्व दिलें तितकें दुसरें कोणीहि दिलेले नाही,

तरी मी आजपासून स्त्रियांच्या उन्नत्यर्थ झटेन, अगदीं शपथपुरस्सर झटेन," अशी शपथ गणपतराव प्रकरण १२ मध्यें घेतो.

हरिभाऊंनी ही आपल्या अंतरीची तळमळ गणपतरावाच्या मुखानें व्यक्त केली, आणि येथून पुढें त्यांनी जी जी ग्रंथरचना केली तिचें, स्त्रियांची सुधारणा करणें, हे एकच सूत्र असलेलें दिसून येईल. गणपतराव या कादंबरीची ३० वर्षांपूर्वी जेवढी प्रकरणे झाली तेथेच अपरिसमाप्त स्थितीत तिला काळ कंठावा लागला आणि आतां तर ती समाप्त होण्याची आशाच समाप्त झाली. एक कादंबरी लिहीत असतां दुसऱ्या अनेक कथानकांनी डोक्यांत काहूर उसळून द्यावे आणि ज्या कथानकाचा विशेष जोर व्हावा तेंच पुढच्याला मागे सारून पुढें व्हावें, असे प्रकार हरिभाऊंच्या लेखनव्यवसायात अनेक वेळा घडले. त्यांच्या कित्येक कादंबऱ्या अपूर्ण राहिल्या, कित्येक तर बऱ्या प्रौढावस्थेस पोंहोचल्या असतांही थकल्या त्याचें हेच कारण होय.

मनोरंजन आणि निबंधचंद्रिका या मासिकात त्यांनी आणखीहि कित्येक पुस्तकें लिहिली. व्हिक्टर ह्यूगोच्या हर्नानी या पुस्तकाच्या आधारें श्रुतकीर्ति चरित्र हे नाटक लिहून त्यांनी याच मासिकात प्रसिद्ध केले. त्याचप्रमाणें विख्यात प्रहसनकार मोलियर याच्याहि कित्येक प्रहसनांची भाषांतरें त्यांनी यांतच प्रकाशित केली. मारून मुटकून वैद्यबुवा, धूर्तविलसित, जबरीचा विवाह ही अशाच प्रकारची प्रहसनें होत. चाणाक्षपणाचा कळस, दुर्गांताईची ओवाळणी व पाडव्याला भेट या गोष्टीहि त्यांनीं याच काळात प्रसिद्ध केल्या १८८७ पासून १८८९ पर्यंत म्हणजे सुमारे तीन वर्षांत ही सर्व पुस्तके प्रसिद्ध झाली. मोलिअरची त्यांनी केलेली भाषांतरें तर इतकी सुंदर झाली की, ती भाषांतरे आहेत असें सांगितल्याशिवाय कोणाला ओळखताहि येणार नाही. असा त्यांजवर प्रो. वासुदेवराव केळकर यांच्यासारख्या रसिक भाषाभिज्ञांनी अभिप्राय व्यक्त केला.

## अनेक भाषाभिज्ञता.

या काळात त्यांनी फ्रेंच भाषेचा अभ्यास केला. वर व्हिक्टर ह्यूगो व मोलियर यांच्या पुस्तकांची जीं रूपांतरे सांगितली ती या अभ्यासाचेंच फळ होत. गायन, वैद्यक, गणित वगैरे विषयांना जसा उपजत अंगस्वभाव लागतो, त्याप्रमाणेच भाषाभिज्ञतेचीहि स्थिति असली पाहिजे. हरिभाऊंना फ्रेंच व जर्मन या परभाषा व बंगाली गुजराथी वगैरे देशी भाषा चांगल्या येत असत. आणि त्या त्यांना अल्पायासानें व अल्पकाळांत अवगत करून घेतां आल्या याचें कारण त्यांचा हा अंगस्वभावच होय असें म्हणण्यास हरकत नाही.

# प्रकरण पांचवें.

## करमणुकीचा जन्म.

### वाचनाचें निकोप साधन.

आपल्या हातून नियमित रीतीने काम होऊन आपला लेखनव्यवसाय अव्याहत ठावा, यासाठी आपले एक स्वतंत्र पत्र असणे जरूर आहे, असें वयाच्या पंच- ।नितर हरिभाऊंना वाटूं लागलें व १८९० सालीं आक्टोबरअखेर त्यांनीं 'रमणूक" पत्र सुरू केलें. यावेळीं हरिभाऊंचें वय अवघें सव्वीस वर्षांचे होते. पण सामान्य बुद्धीच्या माणसाला आजन्म लेखनव्यवसाय चालवून जी कीर्ति ाविणें मुष्किलीच झालें असते, ती कीर्ति हरिभाऊंनीं या अल्पवयांत संपादन ी होती. " करमणूक " पत्र सुरू होतांच त्यावर वाचकांच्या उड्या पडूं ाल्या, व त्यांत प्रसिद्ध होणाऱ्या गोष्टी, चुटके, कादंबऱ्या यांनीं महाराष्ट्रातील ुरुष वाचकांना चटका लावून सोडला आणि रिकाम्या वेळान 'करमणूक' नी मणूक होऊन बुद्धीचाहि विकास करण्याचें साधन त्यांना उपलब्ध करून दिलें.

" काय करावं, मराठींत तुमच्यासारख्यांना वाचायला बुकेच नाहीत गलीशी. हेंच इंग्रजी शिकतीस थोडंसं म्हणजे होती कांही पंचाईत. " ( गण- ाव प्र. १० ). गणपतरावासारख्या प्रगल्भ विचाराच्या ज्या पुरुषास पल्या पत्नीस शिकविण्याकरितां चांगल्या पुस्तकाची उणीव भासत होती, ती करण्याचें महत्त्वाचें कार्य करमणुकीने केलें, याबद्दल कोणासही मनःपूर्वक ज्ञताच वाटेल. करमणुकीनें वाचनाकडे ज्यांची प्रवृत्ति झाली अशा आज ंडों स्त्रिया महाराष्ट्रांत सापडतील. शेंकडों शाळांनी जें कार्य कदाचित् झालें तें तें करमणुकीनें वर्षानुवर्ष बिनबोभाट कसें केलें याचा इतिहास अगदीं ता असल्यामुळें त्यासंबंधानें विशेष लिहिण्याचें कारण नाहीं. करमणुकीने स्त्री- ाकच काय, पण स्त्रीलेखकहि निर्माण केले ही तिची कामगिरी महाराष्ट्र- मयाच्या व स्त्रीशिक्षणाच्या इतिहासात निःसंशय संस्मरणीय होऊन राहील.

करमणुक पत्र काढण्याचा जो उद्देश हरिभाऊंनीं पहिल्याच अंकांत प्रदर्शित केला आहे, तो पाहिला म्हणजे या उद्देशांत दर्शविलेल्या प्रतिज्ञेची त्यांनीं आपल्या पुस्तकांनी कशी पूर्ती केली हे समजून येईल. हरिभाऊ आपल्या उद्देशांत म्हणतातः-

केसरी सुधारक एखाद्या कठोर रित्याप्रमाणें कठोर शब्दानें सांगणार व समाजाचें अप्रशस्त वर्तन झाल्यास वेळीं वाक्प्रतोदाचे तडाके लगावणार तीच गोष्ट हें पत्र प्रेमळ मातेप्रमाणें गोडगोड शब्दांनीं व चांगल्या चांगल्या गोष्टींनीं अप्रशस्त वर्तनाबद्दल मायेचें शासन करणार. येवढें मात्र ध्यानांत ठेवावें, की हें पत्र आचरट आईप्रमाणें फाजील लाड करणार नाही..........ज्यास पुढल्या माडीपासून चुलीपर्यंत व दिवाणखान्यांतील टेबलापासून फणीकरंड्याच्या पेटी-पर्यंत कोणाच्या हाती पडलें तरी हवे त्यानें, हवें त्याच्या देखत निःशंकपणानें वाचण्यास हरकत नाही असें पत्र पाहिजे असेल तर त्यांनीं अवश्य करमणुकीचे वर्गणीदार व्हावें ......शनिवारी संध्याकाळी थकून भागून आल्यावर आपल्या कुटुंबांतील लहान मोठ्या माणसांस जमवून खुशाल हंसत खेळत करमणूक करून ज्ञान मिळविण्याची ज्याची इच्छा असेल त्याचे आम्ही नम्र सेवक आहोत.

## करमणुकीवरील अभिप्राय.

वरील उद्देशावरून हरिभाऊंचा आत्मविश्वास केवढा दांडगा होता हे दिसून येते. कोणालाही, कोठेंही व कोणाच्याही देखत बिनदिक्कत वाचता यावें असे वाङ्मय आम्ही प्रसिद्ध करूं, हे जें वरील उद्देशांत त्यांनीं सांगितलें आहे, त्याचप्रमाणें त्यांनीं आपली ग्रंथरचना अत्यंत शुद्ध व कुलीन माणसांनीं वाचून मनन करण्यासारखी अशी केली. शृंगाररसाशिवायही कादंबरीस हृदयं-गमता कशी आणता येते हें त्यानी उत्कृष्ट रीतीने दाखवून दिलें. ' पण लक्ष्यात कोण घेतो, ' या कादंबरींतील प्रकरणे करमणुकींत प्रसिद्ध झाली त्या वेळी कित्येक प्रमुख स्त्रीपुरुषांकडून हरिभाऊंस पत्रें येत. त्यांतील काहीं पत्रें फारच नामी असल्यामुळें त्यांतील काही उतारे थोडक्यात येथे दिले असतां अप्रासंगिक होईल असें वाटत नाहीं.

कै. प्रि. वामन शिवराम आपटे हे आपल्या अभिप्रायांत म्हणतातः—

" इतकी बोधपर, नीतिपर, आल्हाद्कर गोष्ट फार विरळा सांपडेल. गोष्टीचें संविधानक फारच साधें व नित्य व्यवहाराच्या स्थितीला धरूनच बहुशा आहे. परंतु

भाषाशैली फार शुद्ध व चटकदार आहे, तेणेंकरून वाचणाऱ्यांना कंटाळा येत नाहीं. शिवाय विशेष महत्वाची गोष्ट ही की, तिच्यात अश्लीलपणाचा गंधही नाहीं."

प्रो. वा. बा. केळकर हे लिहितातः–

"कल्पित कादंबऱ्यांविषयीं नाकें मुरडणाऱ्या लोकांनी ही कादंबरी वाचून पहावी म्हणजे कादंबरी हा एक मनःशुद्धीच्या सौम्य उपायांपैकी श्रेष्ठ व तीव्र गुणकारी उपाय आहे हें त्यांस तेव्हाच कळून येईल."

सौ. काशीताई कानिटकर लिहितातः—

"दर सोमवारी टपाल आधी कोणाच्या हातीं पडते यासाठीं तीं (मुलें) जपत असतात व तो अंक घेऊन समयीजवळ कोंडाळें करून तीं सर्व वाचून कर्मणूक करून घेतात. त्याचप्रमाणें आम्ही मोठी माणसेंही ती गोष्ट लक्ष लावून वाचतों व ती खरोखर घडलेली गोष्ट आहे असें आम्हाला वाटतें."

सौ. स. शिरगांवकर या लिहितातः—

"ही कादंबरी एकदां वाचल्यानें कंटाळा येण्याजोगी नाहीं तर जितक्यानदां वाचावी तितकी थोडीच असें वाटणारी आहे."

सौ. रमाबाई रानडे लिहितातः—

"ही गोष्ट वाचून कित्येक बायकांना तर ती आपली लहान वयांतील गोष्ट कोणी कांहीं फेरबदल करून लिहिली आहे असे वाटल्यावाचून रहात नाही. तोच समज पुढेंही कांहीं ठिकाणीं कायम राहतोच."

## हरिभाऊंच्या सामाजिक कादंबऱ्या.

पण लक्ष्यांत कोण घेतो व हरिभाऊंच्या इतर सामाजिक कादंबऱ्या यांतील पात्रें अगदीं रोजच्या व्यवहारांतील आहेत याबद्दल वर दिलेल्या, विशेषतः विदुषी स्त्रियांच्या अभिप्रायांवरून कोणास संशय राहील असें वाटत नाहीं. स्त्रीशिक्षण, सासुरवास न करणें, बालविवाहनिषेध, वाढ पूर्ण होण्यापूर्वी यौवन सुखानुभवाचा प्रतिबंध इत्यादि सर्व अपेक्षित सुधारणांचें बीं रुजविण्याचा या एकाच कादंबरींत हरिभाऊंनीं उपक्रम केला आहे.

मी या कादंबरीत या सर्व आपत्ती दूर करण्याकरितां एका खऱ्या समाज-सुधारकाकरवीं उपाय सुचविण्यांत आला आहे. कर्मयोग हा 'मी' कादंबरींत ग्रथित झालेल्या तत्त्वांचाच पुढचा विकास होय. 'यशवंतराव' खरे व 'आजच' या

दोन कादंबऱ्या समाजसुधारणेस प्रतिकूल असलेल्या व राजकीय सुधारणेवरच सर्वस्वी भर ठेवणाऱ्या अशा आहेत. पण त्यांच्या कथानकास कोठेंच पूर्णता आलेली नाही. कारण त्यापैकीं 'आजच' ही कादंबरी अपूर्ण स्थितींत राहिली.

'जग हे असें आहे' या कादंबरीत सापत्न संबंधामुळें होणारे दुष्परिणाम वर्णिले आहेत. 'भयंकर दिव्य' यात सोनेरी टोळीची दुष्कृत्ये वर्णन केलेली आहेत. 'मायेचा बाजार' या कादंबरीत दुष्टपतीमुळें स्त्रियाच्या होणाऱ्या दुःस्थितीचें शब्दचित्र रेखाटले आहे.

या सर्व कादंबऱ्यांत एकंदर तीन पिढ्यांचा इतिहास आहे. गणपतरावाचा मुलगा चंद्रशेखर हा कर्मयोगाचा नायक आहे. 'मी' या कादंबरींतील ताईचा मठ "भयंकर दिव्यात," "आजच" मध्ये व "कर्मयोगात"हि अधिष्ठित झालेला दिसतो. "यशवतरावां"तील व "भयंकर दिव्यां"तील पात्रे "आजच"मध्ये आणि "कर्मयोगात" हि आलेली आहेत. वर दिलेल्या कादंबऱ्यापैकी "गणपतराव" "आजच" व "कर्मयोग" या अपूर्ण आहेत.

## ऐतिहासिक कादंबऱ्या.

हरिभाऊंच्या ऐतिहासिक कादबऱ्या पुढें दिल्याप्रमाणे आहेतः—पहिली "**म्हैसूरचा वाघ**" (आधाररचित). दुसरी "**उषःकाल**". यांत शिवाजीचा उदयकाल वर्णन केला आहे. तिसरी '**सूर्योदय**' यात अफजुलखानाच्या वधाचें कथात्मक वर्णन केले आहे. चवथी '**सूर्यग्रहण**' या कादंबरीत शिवाजी औरंगजेबाच्या कैदेंत पडलेला आहे, त्या काळची स्थिति आलेली आहे. पांचवी ऐतिहासिक गोष्ट म्हणजे "**गड आला पण सिंह गेला**" ही होय. सहावी "**मध्यान्ह**" ही सवाई माधवरावांच्या काळची आहे. सातवी "**चंद्रगुप्त.**" आठवी "**कालकूट**". या कादंबरींत पृथ्वीराज चव्हाणाचें कथानक आहे. नववी "**वज्राघात**" यात विजयनगरच्या विनाशकालाची परिस्थिति वर्णन केली आहे, व दहावी "**रूपनगरची राजकन्या**" ही होय. या कादंबऱ्यांपैकी "सूर्यग्रहण," "मध्यान्ह," व "कालकूट" या अपूर्ण स्थितीतच आहेत.

हरिभाऊंच्या सामाजिक तीन, व ऐतिहासिक तीन अशा एकंदर सहा कादंबऱ्या असमाप्त राहिल्या आहेत. या आपल्या हातून पुऱ्या व्हाव्या, अशी त्यांची फार इच्छा होती. जलोदरासारख्या असाध्य रोगानें गांठलें

असतांहि त्यांचा हाच ध्यास सारखा चालला होता. "अपूर्ण कादंबऱ्यांची अवशिष्ट कथानकें डोक्यांत सर्व तयार आहेत. हातांत लेखणी धरण्यास शक्ति आली कीं हें काम मी तावडतोब करीन" असे ते म्हणत. आपल्या मुलाबाळांची व्यवस्था न करतां आल्यामुळें मनुष्याची मृत्युशय्येवर जी स्थिति व्हावी, तीच हरिभाऊंची आपल्या असमाप्त कादंबऱ्यासंबंधानें झाली होती ! देहावसान होतांना मृत्युलोकचा त्याना जर कांही धागा राहिला असेल तर तो अर्धवट रस्त्यात सोडुन दिलेल्या या आपल्या अपत्यासंबंधानेंच होय !

कथानकाचा संकल्प ठरवून त्यांची सुसंगत रीतीनें रचना करणें, त्यांतील पात्राचा कथानकांतील प्रसंगानुरूप उठाव करणे, स्थलवर्णनाची हुबेहुब मांडणी करणे, पात्राच्या स्वभावाचें यथार्थ दिग्दर्शन करणें, कथानकांतील निरनिराळ्या घटकांचा परिपोष यथाक्रम व यथाप्रमाण होईल अशी तरतूद करणें वगैरे संबंधात हरिभाऊंचा हातखंडा असे. कल्पनेने निर्मित अशा कृत्रिम सृष्टीची स्वाभाविक सृष्टीप्रमाणें बेमालुम बनावट करणें हा जो उत्कृष्ट कादंबरीकाराचा गुण तो हरिभाऊंना सहजसाध्य होता. त्याच्या कादंबऱ्या वाचणाराला, कादंबऱ्यांत वर्णन केलेले प्रसंग प्रत्यक्ष आपल्या डोळ्यापुढें घडत आहेत असा भास झाल्याशिवाय रहात नाही.

'मायेचा बाजार' या कादंबरींत पद्मेवर त्यांनी जे संकटाचे एकामागून एक भयंकर प्रसंग आणून त्यांतच तिची अखेर केली, ते प्रकार वाचून एका वाचकानें त्यांना एक पत्र पाठवून त्यांची चांगलीच खरडपट्टी काढली होती. "या स्त्रीचा तूं इतका छळ केलास तेव्हां तूं असा पाषाणहृदयी आहेस तरी कोण ? तिला थोडा तरी सुखाचा अनुभव येऊं दिला असतास तर त्यांत तुझ्या बापाचें कांहीं गेलें असतें का ? " असें या गृहस्थानें हरिभाऊंना पाठविलेल्या आपल्या पत्रांत म्हटले होते. आपण निर्माण केलेली ही कल्पनासृष्टि आहे याचाहि या वाचकाला विसर पडला, हें पाहून हरिभाऊंना आपल्या लेखनकलेचें कौतुक वाटलें असल्यास त्यांत कांहीं आश्चर्य नाही. ' भयंकर दिव्य ' या कादंबरींत ' वार्धक्यकुठार ' नावाच्या औषधाची जाहिरात कथानकाच्या संदर्भानें त्यांनीं आणली आहे, ती पाहून एकदोन माणसांकडून त्यांना हें औषध पाठविण्याविषयीं पत्रेंहि आलीं ! " पण लक्ष्यांत कोण घेतो ? " ही कादंबरी पुस्तकरूपानें प्रसिद्ध होईपर्यंत ती खरोखरच यमना

नावाच्या एका स्त्रीनें लिहिली असें समजणारे कित्येक वाचक होते; आणि त्याप्रमाणें हरिभाऊंकडे कित्येक पत्रेंहि आलीं. नाशिकच्या एका विद्वान् शास्त्र्यानीं हरिभाऊंची " चंद्रगुप्त " ही कादंबरी वाचली व हरिभाऊंना लिहिलें, कीं, " 'मुद्राराक्षस' नाटक मी कित्येक वेळा वाचलें व विद्यार्थ्यांनाहि शिकविलें; पण आर्यचाणक्याच्या भूमिकेचे रहस्य आपली कादंबरी वाचूनच माझ्या लक्षांत आलें।"

हरिभाऊंच्या लेखनव्यवसायाच्या प्रारंभाचा काळ म्हणजे चाळीस वर्षां-पूर्वींचा काल, हा एका दृष्टीने विशेष नाजूक होता. इंग्रजी राज्याच्या वैभवानें आपल्या लोकांच्या डोळ्यांवर जो दीप आला होता तो अद्याप अवशिष्ट होता. येवढा थोरला प्रचंड देश एकछत्री करून त्यात इंग्रजांनी अखंड शांतता स्थापन केली, या विचाराने लोकांची मने वेडावून गेल्यासारखीं झाली होती. त्याच्यामधील आत्मविश्वास पूर्णपणें नष्ट झाला होता. त्याचे पुनरुज्जीवन करून, आपणहि उद्योग केला तर आपला भविष्यत्काळ आपणाला खचित उज्ज्वल करता येईल, अशी लोकांमध्यें जाणीव उत्पन्न होणे यावेळी जरूर होते. ही जाणीव उत्पन्न करण्यास निरनिराळ्या प्रकारानी पात्र असलेले जे अनेक पुरुष त्या वेळेस जन्मास आले त्यातच हरिभाऊंची गणना करणे कसे जरूर आहे, हे यांच्या ग्रंथाचे ज्यांनीं परिशीलन केले आहे त्यांना वेगळे सांगावयास नकोच.

लोकांमध्ये आत्मविश्वास उत्पन्न करण्यास त्यांना त्यांच्या पूर्ववैभवाचें स्मरण करून द्यावे लागते. त्याचप्रमाणे ज्या अवगुणाच्यामुळें व सामाजिक दुष्ट चालीरीतीमुळे आपली अवनति झाली ते अवगुण व त्या चालीरीती यांचा त्याग केल्याशिवाय आपल्याला पूर्ववैभवाचें पुनरुज्जीवन करतां यावयाचे नाही, हेहि सत्य लोकांच्या मनावर ठसविणे जरूर असते. हरिभाऊंच्या ऐतिहासिक व सामाजिक कादंबऱ्यांनी हाच महत्त्वाचा कार्यभाग केला, आणि तो त्यानी लोकाना समजेल अशा सुलभ व पटेल अशा मोहक रीतीनें केल्यामुळें विशेष यशस्वी ठरला.

त्यांचा दांडगा विद्याव्यासंग, त्यांची उज्वल प्रतिभाशक्ति व मोठमोठे उदात्त विचारही अगदी सोप्या भाषेंत व्यक्त करण्याची त्यांची हतोटी या गुणत्रयामुळें त्यांचीं पुस्तकें इतकीं लोकप्रिय झाली. लोक-जागृति करण्याच्या इतर शाखांत एकाला दोन किंवा दोहोला तीन अशीं थोर माणसे सांपडतील, पण हरिभाऊंनीं लोकजागृतीची जी विवक्षित शाखा अगदी अल्पवयापासून स्वीकारली, व जिची कायावाचामनेकरून त्यांनीं आजन्म जोपासना केली त्या शाखेंत मात्र त्याना एकहि जोडीदार मिळाला नाही. या शाखेंत ते ' **एकमेवाद्वितीय**'च होऊन राहिले.

---

# प्रकरण सहावें.

## कादंबऱ्यांचा कार्यभाग.

### सद्यःस्थिति व ती सुधारण्याचे उपाय.

आपल्या समाजांतील स्त्रियांची जी अवनत स्थिति आहे ती सुधारल्या-शिवाय आपली खरी सुधारणा केव्हांही होणार नाहीं, ही कल्पना अगदी बाल्यावस्थेत हरिभाऊंच्या मनात उत्पन्न झाली व मिलच्या वाचनाने त्या कल्पनेस मजबुती येऊन " मी आजपासून स्त्रियांच्या उन्नत्यर्थ झटेन " अशी गणपतरावाच्या मुखानें त्यांनी अगदीं तरुण वयांत प्रतिज्ञा केली. " कोणाही गृहस्थाच्या ठिकाणी आपल्या बायकोच्या बोलण्याविषयी किंवा तिच्या मताविषयी आदरबुद्धि वसत असलेली त्याच्या नजरेस आली म्हणजे त्याला त्या गृहस्थाविषयीं मोठी पूज्य बुद्धि वाटे. " ( गणपतराव प्र. १३ ). इतके स्त्रियांच्याबद्दल हरिभाऊंच्या ठिकाणीं दाक्षिण्य वसत असे. असो. पुढे आपल्या निरीक्षणशक्तीनें त्यांनी जी सामुग्री जमविली ती या प्रतिज्ञा-पूर्तीस पोषक अशींच होती. आपल्या समाजात आज स्त्रियांची स्थिति खरोखर कशी आहे याची त्यांनी आपल्या सूक्ष्म दृष्टीनें छाननी केली ती किती समर्पक व मार्मिक आहे हें विशेषतः त्यांची ' पण लक्ष्यांत कोण घेतो ! ' ही कादंबरी वाचली असतां कोणाच्याही लक्षांत येईल.

### सर्वत्र एकच हेतु.

हरिभाऊंची कोणतीही कादंबरी घ्या, तीत कथानकाची उभारणी कोणत्याही प्रकारची असली तरी त्यात, स्त्रियाची स्थिति सुधारणे, हाच एक हेतु गर्भित झालेला दिसतो. ' पण लक्ष्यांत कोण घेतो ' यांमध्यें यमुनेनें आपलें चारित्र सांगितलें तेंही " मला माझे चरित्र कांहीं हेतूनें लिहावयाचें आहे; माझ्या पश्चात् तें प्रसिद्ध होऊन त्यापासून कोणाला कांही आमच्या हीन स्थितीबद्दल कींव वाटूं लागली तर माझी इच्छा अगदी परिपूर्ण होईल," व " आम्हां मुलींना आपल्या आयुष्यक्रमाबद्दल साधारणतः वाटतें काय आणि आमचे स्वतःचे बरे वाईट अनुभव असतात काय, हें माझ्या पश्चात् लोकांना कळावें आणि त्यांत

खरोखर कांही सुधारण्याजोगे वाटलें तर त्यांनीं तशी तजवीज करावी " या हेतूनेंच सांगितलेला आहे. यमुनेचें हें हृदयास पाझर फोडणारें व डोळ्यांतून अश्रू गाळावयास लावणारें आत्मचरित्र ऐकूनच कीं काय, " दुबळया कष्ट्यांना जबरदस्तापासून त्रास होत असला तर तो दूर करण्याला आपला हात पुढें असावा " असें धोरण "मी"नें स्वीकारलें. गणपतरावामधील गोदावरी, ' पण लक्ष्यांत घेतो ' मधील यमुना व दुर्गी, 'मी' मधील ताई, भयंकर दिव्यांतील कमला, मायेच्या बाजारामधील मालती व मथुरा या सर्व स्त्रियांचें आयुष्यक्रम निरनिराळ्या कथाप्रसंगांत गोंवलेले असले तरी या स्त्रियांच्या संरक्षणार्थ 'मी' सारखे शेंकडों पुरुष उज्वल हेतु धरून निरपेक्ष भावनेनें पुढें यावे हाच हरिभाऊंचा हेतु सर्वत्र सारखाच दिसून येतो.

## दांडगाईनें सिद्ध होणार नाहीं.

'हा हेतु बळजबरीनें अमलांत आणणें हे समाजाच्या हिताला अपायकारक आहे' (गणपतराव पान ७४) व 'कोणतीही गोष्ट सावकाशी सावकाशीनें |जितकी होईल तितकी एकदम दांडगाईनें होणार नाही.' (मी प्रकरण ६०). असेंच हरिभाऊंचें मत होतें. " धीरें धीरे कां होईना, पण स्त्रीची सुधारणा पाहिजे. अतिशय उष्णतेंतून निघून अतिशय थंडीत गेलें म्हणजे काय बरें अनर्थ होतात." (गणपतराव प्रकरण १०) हा प्रश्न डोळ्यांपुढें ठेवूनच हरिभाऊंनीं आपली ग्रंथरचना केली आणि ती तशी केली म्हणूनच आज तिला इतकें महत्त्व आलें आहे.

## मनोघटनेशीं तादात्म्य.

हरिभाऊंनीं आपल्या स्त्रीवाचकांकडून व सहृदय व प्रगमनशील अशा पुरुषवाचकांकडून "पण लक्ष्यांत कोण घेतो" असे उद्गार काढविणारी कादंबरी लिहिली त्या वेळचा काळ कित्येक जुन्या चालीरीतींचा अस्त व नवीन कल्पनांच उदय याचा संधिकाळ होता, त्याचा सांधा बरोबर जमविणें म्हणजे जुन्यांतील चांगलें तेवढें सजीव ठेवणें व वाईटाच्या कुडीत नवीन विचारांचें जीवन घालून त्याचें स्वरूप उज्वल व समाजोपकारक असें करणें हेंच होय. हरिभाऊंच्या ग्रंथकर्तृत्वाचें हेंच कार्य होतें. हें योग्य रीतीनें पार पाडण्यास समाजांतील मुलें, तरुण व वृद्ध स्त्रीपुरुष या सर्वांच्या मनोघटनेचें यथार्थ निरीक्षण हरिभाऊंनीं केलें व त्यांचीं शब्दचित्रें वस्तुसृष्टीस धरूनच त्यांनीं रेखाटलीं. हरि-

## कादंबऱ्यांचा कार्यभाग.

भाऊंना अनेक भाषायेत होत्या याबद्दल ते अर्थातच प्रशंसेस पात्र होते. या भाषा कमी अधिक श्रमानें पुष्कळांना हस्तगत करून घेता येतील. पण त्यांनी आपल्या कादंबऱ्यातून मुलामुलींचे, युवायुवतींचे, वयस्क स्त्रीपुरुषांचे, सुशिक्षित अशिक्षितांचे, सुष्ट दुष्टांचें, विचार हुबेहूब त्याच्या भाषेत प्रदर्शित केले आहेत, ही कला मात्र आजमित्तीपर्यंत तरी दुसऱ्या कोणास साधलेली दिसत नाही. त्याना ती उत्कृष्ट साधली याचे कारण या सर्वांच्या मनोघटनेशी त्याना तादात्म्य पावता आलें, त्याच्या मनोव्यापारांची त्याना मनोमय साक्ष पटली हें होय. समाजाशी ते तद्रूप झाले म्हणूनच त्याच्या कादंबऱ्यात समाजाचें आत्मचरित्र प्रतिबिंबित झाले आहे. हरिभाऊंचे ग्रंथ समाजास दर्पणवत् नुसते बाह्यरूपदर्शकच झाले नाहींत तर एक्सरेजप्रमाणे अन्तर्गत मनाचेंही ज्ञान करून देणारे झाले. त्याच्या ग्रंथातील हा खरोखरच असाधारण गुण होय.

## मायेचें शासन.

समाजास नवीन विचाराची जी शिकवण द्यावयाची ती देताना अनेक गोष्टींची खबरदारी घ्यावी लागते. समाजाचे अवगुण त्यास दाखवावयाचे म्हणजे ते मोठ्या खुबीनें दाखवावे लागतात. आपली निंदा स्वतःच्या कानाने ऐकणे कोणासही खपत नाही. समाजाच्या हितचिंतकास व समाजाची खरी सुधारणा व्हावी अशी सदिच्छा बाळगणारास निंदा केल्याशिवाय तर गत्यंतर नसतें. अशा स्थितींत " मातेप्रमाणें गोडगोड शब्दांनी व चांगल्या चांगल्या गोष्टींनी अप्रशस्त वर्तनाबद्दल त्यांस मायेचे शासन" करावे लागतें. समाजाची कोणत्याही प्रकारें खुशामत तर करावयाची नाहीं आणि त्याचें मन न दुखेल अशा रीतीने त्याचे अवगुण त्याच्या नजरेस आणून त्याची दृष्टि अंतर्मुख करावी लागते. हें अवघड काम हरिभाऊनीं आपल्या सामाजिक कादंबऱ्यांनी फारच बहारदार रीतीने केलें आहे.

## विचारप्रवर्तन.

सामाजिक सुधारणेवरील व्याख्यानें किंवा लेख यांच्या योगानें समाजात जागृति होते. पण त्या जागृतीची मजल समाजांतील विचारवंत व सुबुद्ध जनतेपलीकडे जात नाहीं. सामान्य जनतेस हे विचार पटण्यास ते त्यांच्याच भाषेंत मांडले गेले पाहिजेत. किंबहुना आपल्या आयुष्यक्रमाचें शब्दचित्र पाहून ते त्यांचे त्यांनाच सुचले पाहिजेत. हरिभाऊंची " पण लक्ष्यांत कोण घेतो " ही

कादंबरी अशाच प्रकारे समाजास विचारप्रवर्तक झालेली आहे. व या कादंबरीस श्रेष्ठ स्थान मिळण्याचेंही हेंच कारण होय.

## आपलेपणाची भावना.

आपली सुधारणा करूं पहाणारा माणूस हा आपल्यांतीलच आहे. त्याचा वागणूक, चालरीत, मनोधर्म वगैरे सर्व आपल्याशी जुळती आहेत अशी समाजाची खात्री झाली म्हणजे तो या मनुष्याच्या म्हणण्याकडे सहाजींकच लक्ष पुरवितो. या माणसास आपल्याबद्दल खरोखरच कळवळा वाटतो, आपले अवगुण जाऊन आपण सुमार्गास लागावे अशी त्याला खरोखरच मनापासून तळमळ वाटते हें समाजास दिसून आलें, आपल्या अवगुणाचें आविष्करण करितांना आपल्या गुणांचेंही यथार्थ निदर्शन करण्यास हा चुकला नाही ही गोष्ट समाजाच्या प्रत्ययास आली म्हणजे ज्या बंधुप्रेमानें, सद्यतेनें व जिव्हाळ्यानें तो समाजास हाक मारतो त्याच बंधुप्रेमानें व जिव्हाळ्यानें समाजही त्याच्या हाकेस मोठ्या तत्परतेनें ओ देतो. हरिभाऊंनी समाजाबद्दल आपलेपणा धरला व त्याच्याशीं जिवलग मैत्री कायम ठेवूनच त्यास मनोरंजनाच्या द्वारें सदुपदेश केला. म्हणूनच त्याच्या कादंबऱ्याना आजचा मोठेपणा प्राप्त झाला आहे.

## रचनाकौशल्य.

कुशल सामाजिक कादंबरीकार आपल्या कथानकाची व त्यातील भूमिकाची अशी खुबीची रचना करितो कीं, वाचकापैकी कोणासही हें आपलेंच वर्णन आहे अशी ओळख पटली तरी तें तो कौतुकानें वाचतो. इतकेंच नव्हे, तर माझ्या स्वभावाचें, आयुष्यक्रमाचें व मनोव्यापाराचें इंगित याच्या लक्षांत-तंतोतंत कसें आलें, याबद्दल त्याला आश्चर्य वाटल्याशिवाय रहात नाहीं. वेडेंवाकडें गाणाराचें गाणें फोनोग्राफांत धरून तें त्याचें त्यालाच ऐकविलें म्हणजे " माझें गाणें इतकें कां विचित्र असतें " असा विचार त्याच्या मनांत येऊन क्षणैक त्याची त्यालासुद्धां करमणूक होते. पण त्यानंतर आपल्या गायनकलेचें प्रदर्शन करण्याचे कामी तो जसा सावधगिरीनेंच वागूं लागतो त्याप्रमाणें च समाजाला आपला आयुष्यक्रम कादंबरींत हुबेहूब रंगविलेला दिसला कीं एवढाले ढोबळ अवगुण मी आज शेंकडों वर्षें कसा वागवीत आलों, याबद्दल त्याचें त्यालाच आश्चर्य वाटूं लागतें व त्या अवगुणांचा निरास करण्याची त्याच्या मनात साहजिकच इच्छा उत्पन्न होते.

## पिछेसे आईचीं मुलें.

समाजास सदयता असते व सहृदयताही असते, तरी पण " रूढी आजी-बाई"चें व " पिछेसे आई"चे त्याच्यावर जबरदस्त वजन असल्यामुळें त्यास सर्व गोष्टी कळल्या तरी त्या वळत नाहींत. ही पिछेसे आई आपल्या मुलांकडून हवें तें घडवूं शकते. " आपल्या पांच वर्षांच्या पोरीस साठ वर्षांच्या थेरड्याच्या गळ्यांत बांधण्यास लावते. बालवैधव्याग्नीनें होरपळलेल्या आपल्या बारा तेरा वर्षांच्या पोरीचें शरीर आपल्या देखत विद्रूप करण्यास लावते. एके वेळीं ती शरीराचें दहनही करण्यास लावीत असे. असा तिचा जोर, असें तिचें वजन, अशी तिची शक्ति " ! ( मी प्रकरण ५७ ). 'मी'ची आजी मोठी ममताळू. पण या लोकापवादरूपी खविसानें पछाडल्यामुळें आपली शुद्ध नातवंडेंही तिला अस्पृश्य वाटूं लागलीं !

## रूढीस धर्माचा पेहराव.

रूढि ही खरोखर भयंकर राक्षसी होय. हिच्या तावडींत सापडून ज्या समाजान आपली विचारशक्ति गमावली त्याचा अधःपात झालाच म्हणून समजावें. आणि या रूढीस धर्माचा पेहराव चढून तिचा धर्मांतच मिलाफ होतो तेव्हां तर या अधःपातास सीमाच रहात नाही. कारण दुष्ट रूढि बदलण्याचा कोणी प्रयत्न केला की तो धर्मावर घाला घालतो, अशी धर्माभिमान्यांची प्रामाणिक समजूत होऊन ते या प्रयत्नास विरोध करूं लागतात. आणि गम्मत ही की, या विरोधात स्त्रियाही पुरस्कार घेतात ! बाल्य, तरुण, वृद्ध वगैरे अवस्थांत स्त्रियांनीं कोणाची तरी मनधरणी करून राहिलें पाहिजे ही स्थिती ईश्वरप्रणीत धर्मानें आपल्या मागें लावून दिली आहे अशी त्यांची दृढश्रद्धा असल्यामुळें, ती दूर झाली पाहिजे अशी इच्छा करणें हेंही त्याना पाप वाटतें आणि तसे प्रयत्न करणारास विरोध करण्यांतच खरें ' पुण्य ' आहे अशी त्याची समजुत होते. गणपतरावांची स्त्री पुनर्विवाहित होती तरीसुद्धां ती " आतां काहीं ताळतंत्र राहिला नाही " (कर्मयोग) ! असे नव्या काळाला उद्देशून उद्गार काढतेच !

## धर्मविषयक अवास्तव कल्पना.

आपल्या समाजातील कोणतीहि बाई पहा, ती तोंडानें ' नको हा स्त्रियांचा जन्म ' असें म्हणत असते. पण तिचें वर्तन त्याच जन्माच्या अनेक आवृत्ती निघाव्या अशाच प्रकारचें असतें ! स्त्रियांच्या मागें धर्मानें अथवा धर्मावर

निर्वाह करणाऱ्या लोकांनी जीं व्रतें लाविलीं आहेत, तीं पाहिलीं म्हणजे या गोष्टीची सत्यता प्रत्ययास येईल. त्यांपैकी कोणाची फलश्रुति पुढच्या जन्मी नवरा चांगला मिळेल ही असावयाची। किंवा सात जन्म अखंड सौभाग्य लाभल असा कोण्या व्रताचा फलादेश असावयाचा ! मिळून सदासर्वदा स्त्री-जन्मच असावा अशाबद्दल आमच्या स्त्रियांची खटपट ! आपली गुलामगिरी जाऊन आपल्याला पुरुषांसारखेच मानासिक व बौद्धिक विकसनाचे मार्ग मोकळे असावे अशी ईश्वराजवळ प्रार्थना करणारी किंवा इतउत्तर आपल्याला पुरुषाचाच जन्म यावा अशी उत्कट इच्छा बाळगणारी हिंदू स्त्री सांपडेल काय ? या सर्वांचें खरें कारण एकंदर समाजामधील, विशेषतः स्त्रियामधील धर्मसंबंधाच्या अवास्तव कल्पना हेंच होय.

## शिक्षण हाच खरा उपाय.

याला खरा उपाय स्त्रियाना शिक्षण देऊन त्यांची मनें सुसंस्कृत करणे हा होय, हें हरिभाऊंनीं आपल्या कादंबऱ्यात मोठ्या कुशलतेनें समाजाच्या निदर्शनास आणलेलें आहे. नणंदाभावजयाचे दुःस्वास, सासवा–सुनातील तेढ, बहिणीबहिणींतीलही हेवेदावे वगैरे प्रकारांमुळें स्त्रीसमाज कसा पोखरलेला आहे ही स्थिति, ' पण लक्ष्यांत कोण घेतो ' यांत अविभक्त कुटुंबाचा शब्दचित्रपट दाखवून हरिभाऊंनी उत्कृष्ट रीतीनें दाखविली आहे. त्यांना शिक्षण देऊन त्यांची मनें सुसंस्कृत केल्यास त्यांचे आपसातील कलह नाहींसे होतील व आपल्या उन्नतीचे उपाय त्यांना एकजुटीनें योजिता येतील, याचाही ' पण लक्ष्यांत कोण घेतो ' मधून निघत असलेला ध्वनि चाणाक्ष वाचकांच्या कानांत गुणगुणल्याशिवाय राहणार नाही.

## हरिभाऊंच्या सृष्टीचा स्वतंत्र काळ.

सारांश काय की, हरिभाऊंच्या कादंबऱ्या नुसत्या सद्विचारांचें निरूपण करणाऱ्याच नव्हेत, तर त्या विचाराच्या अनुरोधानें वाचकांच्या मनांत नवीन विचारांचें काहूर उसळवून देणाऱ्या आहेत. हरिभाऊंनीं सुमारें ३०।३५ वर्षें जी ग्रंथरचना केली, तिनें आपला एक स्वतंत्र काळच निर्माण केला. याचें कारण त्यांनीं विदग्ध वाङ्मयांत म्हटल्याप्रमाणें " सौंदर्यांच्या आत्म्यानें आनंद उत्पन्न करून सत्याचा संचार मनुष्याच्या मनांत उत्पन्न करून देणारें वाङ्मय " त्यांनीं निर्माण केलें हें होय. सत्य जसें त्रिकालाबाधित तशीच त्याचा आश्रय

करून हरिभाऊंनीं आपल्या पुस्तकांत प्रतिपादिलेली विचारसरणीही त्रिकाला-बाधितच आहे. 'अबलोन्नति' हे आपल्या कादंबऱ्याचें बीजभूत तत्व धरून, " दुबळ्या कष्ट्याना जबरदस्तांकडून जो त्रास होतो त्यापासून त्यांचे संरक्षण करणे " या व्यापक धोरणांत त्यांनीं त्याचा विकास केला आहे. व राजकीय, सामाजिक व औद्योगिक कोणत्याही कारणामुळें समाजात दुबळेपणा राहूं न देणे हेंच व्यापक ध्येय या बीजभूत तत्वांपासून त्यानीं परिणत केलें आहे.

## आधीं सामाजिक कीं राजकीय.

आधी सामाजिक की आधी राजकीय या वादानें आपल्या देशांत एक वेळ रणें पडली होती. त्याच काळांत लिहिलेल्या आपल्या ' मी ' या पुस्तकात हरिभाऊंनी थोडक्यात असें उत्तर दिलें आहे की, " सगळ्या शरीराला अशक्तता आली असता एक हात आधी लठ्ठ करून घ्या, मग बाकीच्या शरीराचे पाहूं. असें म्हणण्यापैकीं आधी अमुक मग तमुक असे म्हणणाऱ्याचं म्हणणं असत. " राजकीय व सामाजिक सुधारणेच्या बाबी आमूलाग्र कशा एकरूप आहेत याचें हरिभाऊनी केलेले मार्मिक विवेचन अन्यत्र क्वचितच सापडेल.

सरकार व लोक दोघेही खुशामतप्रिय कसे असतात याचे विवेचन करताना हरिभाऊ म्हणतात, " लोकाना आणि सरकारलाही केवळ स्तुती करून घेण्याची चटक लागलेली आहे. जुन्या चाली मग त्या बऱ्या असोत, वाईट असोत त्याची स्तुति केली की, लोक खुष होतात. सरकारी अधिकऱ्याची कृत्ये बरी असोत, वाईट असोत तीं वाखाणली, इंग्रजी राज्याचे दोष न दाखविता नुसते पोवाडे गाइले कीं सरकार खुष. "

" अधिकारी वर्गाला आपला अधिकार लोकांच्या सुपूर्त करण्याची फार दृढ अशी अनिच्छा. दुसरीकडून आपल्या पूर्वपरंपरागत समाजव्यवस्थेत सुधारणा करण्याची बहुजनसमाजाला फार अनिच्छा. या दोनही अनिच्छा कमी झाल्या पाहिजेत. "

सरकार व लोक, लोक व रीतीभाती, लोक व धर्म याचे अन्योन्य संबंध कसे असावेत याबद्दलचें पुढील वर्णन अत्यंत समपर्क होय :—

" राजा व सरकार हे लोकांच्या सुखाकरितां, लोक त्यांच्या सुखाकरितां नव्हेत. रीतीभाती, आचारविचार हे लोकांच्या सुखाकरितां. लोक त्या रीतीभाती व ते आचारविचार यांकरितां नव्हेत. धर्म हाही लोकांकरितां, लोक धर्माकरिता

नव्हेत. कोणतेंही सरकार, कोणताही राजा, कोणत्याही रीतीभाती, आचार-विचार किंबहुना धर्मसुद्धां लोकांच्या सुखाआड येऊं लागला कीं त्यांत फरक हा झालाच पाहिजे. तो जर योग्य काळीं योग्य तितका झाला तर चांगले. योग्य काळीं योग्य तितका न झाला तर अनर्थकारक, असले विचार, असलें ज्ञान जाणत्या लोकांच्या मनांत भरवून देणें हेच आज आमचें कर्तव्य."

"एकीकडून सरकारच्या धोरणानें घेऊन त्यांचेपासून ज्यास्त सवलती मिळविण्यास व दुसरीकडून लोकांच्या 'धोरणानें घेऊन त्यांचीहि सामाजिक बाबतीत असहनता कमी करण्याला काय व कसे प्रयत्न करावे" ? हा प्रश्न उपस्थित करून त्याचें उत्तरही हरिभाऊंनी मोठ्या विचारपूर्वक रीतीने दिलें आहे. आणि ते "कोणतीही गोष्ट सावकाशी सावकाशीनें जितकी होईल तितकी एकदम दांडगाईनें होणार नाहीं. व दांडगाईनें होणें इष्टही नाहीं." हें होय.

## कर्माचें वेड लागलेलीं माणसें.

विकासमार्गानेंच या सर्व सुधारणा घडवून आणण्यास कार्याचें वेड लागून त्यास सर्वस्वी वाहून घेणारीं माणसें पुढें येणे कसें अवश्य आहे हें सगून हरिभाऊंनी आपल्या 'मी' या कादंबरींत सेवासदन, अनाथ-बालिकाश्रम, सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटी, वगैरेसारख्या संस्थांचा निर्देश करून सहकारी चळवळ, स्त्रीचें शिक्षण वगैरे बाबींचाही उल्लेख केलेला आहे. हरिभाऊंची 'मी' ही कादंबरी ९५ सालापूर्वी लिहिली गेली. अर्थात् वरीलपैकी कोणतीही संस्था किंवा चळवळ अस्तित्वांत नसतां त्यांनीं त्यांची बरोबर रूपरेषा आखावी यावरून आपल्या स्वोन्नतिकारक चळवळीस कालांतरानें लागणाऱ्या वळणाचें हरिभाऊंनी कसें बरोबर भविष्य वर्तविलें आहे हें दिसून येईल. त्याच्या आजच या कादंबरीत अराजक पक्षाच्या उत्प-त्तीचेंही दिग्दर्शन केलेलें आढळतें, तेंही बंगालमध्यें अराजक पंथ अस्तित्वांत येण्यापूर्वी ५।४ वर्षें केलेलें आहे, हीही गोष्ट येथें नमूद करणें जरूर वाटतें.

अशी भविष्यदर्शी दृष्टि त्यांना येण्याचें कारण दुसरें कांहीं नसून त्यांनीं समा-जाचें नुसतें वरवर अवलोकन न करतां त्याच्या अंतरंगांत प्रवेश केला, त्यांतील सर्व व्यापार त्यांनीं काळजीपूर्वक अवलोकन केले व या व्यापारांचें पर्यवसान कोठें होणार हे आपल्या प्रतिभाशक्तीनें बरोबर जाणलें. तेजस्वी प्रतिभा, उज्वल कल्पनाशक्ती, सदय मनोवृत्ति या गुणांस विद्याव्यासंग व सदभिरुचि यांचें कोंदण असल्यावर उत्कृष्ट ग्रंथ कसे निर्माण होतात, अचेतन सृष्टींतही चैतन्य कसें घालतां येतें याचें हरिभाऊंच्या कादंबऱ्या हें सर्वथा प्रशंसनीय असें प्रत्यंतर होय.

# प्रकरण सातवें.

## स्वभावाशीं परिचय.

### अंतःकरणानें प्रेमळ व मनानें थोर.

मनुष्याच्या आयुष्यक्रमांत यच्च यावत् ज्या गोष्टी घडतात त्यास कारण त्याचा स्वभावच होय. मनुष्य लेख लिहो, किंवा व्याख्यान देवो, किंवा खाजगी संभाषण करो, त्यांत त्याचा स्वभाव नेहमी प्रतिबिंबित होत असतो,' किंबहुना मनुष्याच्या व्यवसायांतील कोडीं वाटण्यासारख्या कित्येक गोष्टी त्याचा स्वभाव कळल्याबरोबर पटकन उकलतात. अर्थात् स्वभावाचा याप्रमाणें मनुष्याच्या आयुष्यक्रमाशीं अगदी निकट संबंध असल्यामुळें इतर सर्व गोष्टींपेक्षा त्यांस महत्त्व देणें अपरिहार्य होतें.

हरिभाऊंच्या स्वभावाचे मुख्य गुण म्हटले म्हणजे त्याच्या अंतःकरणाचा प्रेमळपणा व मनाचा थोरपणा हे होत. त्याच्या कादंबऱ्यांत त्यांच्या अंगचे हे गुण पदोपदीं प्रतिबिंबित झालेले दिसतील. त्यानी आपल्या कादंबऱ्यांतलि सर्व भूमिकांना सदय अंतःकरणानेच वागविलेले आहे. केवळ शंकरमामंजी, दिगंबरपंत, किंवा असे दुसरे चांडाळ चौकडीतील लोक यांचा मात्र त्यांनीं तीव्र तिरस्कार व निषेध केलेला आहे. इतर कोणत्याही भूमिकेसंबंधानें त्यांनी कठोरपणाचा कधी एक शब्दही वापरला नाहीं.

ते मनानें जसे मोठे होते तसे स्वभावानेंही शांत असत. त्यांना राग फार क्वचित् येत असे. कोणी मनुष्य भेटीलः आला तर त्याच्याशीं ते फार प्रेमळपणानें बोलत. ते अगदीं निकडीच्या कामात असले तरीसुद्धां भेटीस आलेल्या माणसास परत कधीहि पाठवीत नसत. कारण लोकाना हेलपाटे देऊन त्यांची अडचण कां करा असे ते म्हणत. उलट त्यांजकडे येणाऱ्या लोकांनी असा विचार केला असता तर हरिभाऊंचा निष्कारण जाणारा बराच वेळ वांचला असता. एकदां स्नेही म्हटला म्हणजे त्यास अंतर कधींहि द्यावयाचें नाही असा त्यांचा बाणा असे. त्यांच्या वागणुकींत अशी कांहीं गंमत असे कीं त्याच्या प्रत्येक परिचितास आपण हरिभाऊंचे अगदीं जिवलग स्नेही आहों असें वाटावें !

आपल्या हातून लोकांचा होईल तितका उपयोग व्हावा अशी त्यांना फार इच्छा असे. आपल्याकडे येणाऱ्या सर्व लोकांचींच कामें आपल्या हातून व्हावीं

असे त्याना वाटे. पण ही त्यांच्या मनाची धांव पुष्कळ वेळां मिथ्या ठरून, त्याची इच्छा नसतांही, कित्येक माणसाची निराशा होई. ते मोठे मनमिळाऊ असत. कोणाला उगें अधिक बोलून किंवा निष्कारण त्याच्या इच्छेविरुद्ध जाऊन त्यांनी एखादें मनुष्य तोडलें असें क्वचितच होई. फार काय, त्यांची आगळिक केलेल्या माणसांबद्दलही ते अढी धरून बसत नसत व त्यालाही उपयोगी पडण्याची संधि आली असता वाया दवडीत नसत.

## नोकर-चाकरांचें प्रेम.

त्याचा स्वभाव याप्रमाणे उदार असल्यामुळें नोकर-चाकरही त्याच्यावर खुष असत. नोकरांपैकीं कोणी आजारी वगैरे पडल्यास ते त्याच्या औषधाची व शुश्रूषेची जरूर व्यवस्था करीत. एकदां त्याच्या एका नोकराच्या गुडघ्यास काहीं जखम झाली. ती विकोपास जाऊन गुडघा कापून टाकण्यापर्यंत मजल आली. पण तो नोकर ऑपरेशनला कबूल होईना. तेव्हा तुझ्या पायाचे ऑपरेशन केले तर " मी तुला बैठी नोकरी देईन, तूं कांहीं काळजी करूं नकोस. " असे त्यानी त्याला सांगितले व ऑपरेशननंतर त्याला बैठी नोकरीहि दिली.

## माणसांचे भोक्ते

मंडळीचे ते अतिशय भोक्ते असत. त्याच्या सहवासांत एक दोन माणसें नाहीत असा दिवसच काय, पण एखादा तासही सापडणे कठीण. निदान आठ चार दिवसानीं तरी चार दोन स्नेही पंक्तीला घेऊन भोजन करावे अशा त्याना इच्छा होत असे. आणि तसा योग ते घडवूनही आणीत. एखादा स्नेही असा मरुव असला कीं, त्याच्या येथें कोणाचाही हात भिजणें कठीण, तर त्याच्या घरी पुरवा जमवून आणण्याचें काम हरिभाऊ खास करावयाचे !

घरात एखादा जिन्नस चागला स्वादिष्ट किंवा रुचकर झाला तर तो एकटे बसून खाणें त्यांच्या जिवावर येई. तो खावयास बरोबर कोणी मिळावें म्हणून ते मुद्दाम टेहळणीवर बसून एखाद्यास घरात बोलवावयाचे. त्यांचे एक स्नेही त्याना विनोदानें म्हणत असत कीं, बुकडेपो व पक्वान्नांचें दुकान या धंद्यांस तुम्ही अगदीं नालायख आहांत. कारण, एखादा पदार्थ चांगला झाला कीं, तुम्हीं तो जाणाऱ्या येणाऱ्यांस वांटून टाकायचे, त्याचप्रमाणें डेपोंत असलेलीं चांगली पुस्तकेंही लोकांच्या मागें लागून त्यांना द्यावयाचे।

## विनोदी स्वभाव.

त्यांच्या स्वभावात विनोदाचीही विपुलता असे. पण तो विनोदही प्रेममूलकच होता. ज्याची थट्टा करावयाची त्याला सुद्धा गम्मत वाटावी, अशा प्रकारचा त्यांचा विनोद असे. चुकून कोणाची अधिक थट्टा होऊन कोणास राग आला तर ते त्याची तात्काळ समजून करीत. ते म्हणत, स्नेह घालविणें सोपें आहे. पण मिळविणें कठीण आहे. कित्येक थट्टेखोर माणसें फार चिडखोर असतात. लोकांची चेष्टा करण्यात ते मोठे बहाद्दर, पण स्वतःची चेष्टा कोणी केली की तात्काळ झालेच लाल ! अशांतले हरिभाऊ नव्हते. कोणी मार्मिक रीतीनें आपली चेष्टा केली की तेही हंसूं लागत.

१९०८–१९०९ सालच्या सुमारास त्यांचे डोळे फारच बिघडले व करमणुकीचा मजकूर लिहिण्याचें काम त्यांच्याच्यानें होईना. तेव्हा त्यांनी आपले मित्र रा. कृष्णाजी केशव गोखले यांना करमणुकीकरिता मजकूर पाठविण्याबद्दल विनंति केली. काका गोखल्यांना अशा प्रकारचा मजकूर लिहिण्याची संवय नव्हती. तरी त्यांनी प्रयत्न करून हरिभाऊंकडे दहा गोष्टी लिहून पाठविल्या. त्या हरिभाऊंच्या उपयोगींही पडल्या. त्यांनी काकांना याबद्दल आभारप्रदर्शक पत्र लिहिले. त्यात 'अंधभक्ती ( अंधाबद्दलची भक्ति ) बद्दल मी आपले आभार मानतो ' असे लिहिलें होतें !

## साधी वागणूक.

हरिभाऊ श्रीमंतीत वाढले होते तरी त्यांची वागणूक अगदी साधी असे. व यांच्या सात वर्षांपासून त्यांना थंड पाण्यानें स्नान करण्याची स्वय असे. कितीही थंडी असो किंवा ती कोणत्याही प्रदेशातील असो, हरिभाऊ नेहमी सकाळी थंड पाण्याने स्नान करीत. जेवणाची त्यांची कधी तक्रार नसे. पण त्यातल्या त्यात चमचमित पदार्थ त्यांना विशेष आवडत. हा त्यांचा लौकिक अगदीं कॉलेजच्या दिवसापासून होता. प्रवासात त्यांना विशेष बाडबिछानाही बरोबर घेऊन जावें लागत नसे. कारण एक घोंगडी व त्यावर एक चादर येवढे असले की त्यांचा बिछाना थाटला जाई ! हरिभाऊंनी सर्व हिंदुस्थानात प्रवास केला. पण त्यांना जेवणाखाण्याची किंवा इतर कोणत्याही गोष्टीची खोड नसल्यामुळे प्रवासांत त्यांचे केव्हाही अडत नसे. कोणाच्याही घरी उतरले तरी ते घटका दोन घटकांच्या परिचयानेंच घरांतल्या मंडळीत सामावून जावयाचे. असा त्यांचा

स्वभाव असे. जेथे ते उतरत तेथील माणसें गरीब असोत किंवा श्रीमत असोत, हरिभाऊंना त्याची कधीहि क्षिती वाटली नाही. त्यांच्या स्नेह्यांमध्ये श्रीमंताचाच भरणा फार असे. पण गरीब स्नेह्यांना ते विशेष आदरानें वागवीत असत.

त्यांचें वाचन दांडगें असल्यामुळें त्यांच्याजवळ विनोदमहदाख्यायिकांचा चांगला संग्रह असे. सकाळीं स्नेही मंडळीसमवेत फिरावयास गेले म्हणजे त्यातील एक एक चुटके सांगून ते आपल्या मित्राची करमणूक करीत. सर्व मंडळींची बहार काय ती हरिभाऊंवर. हरिभाऊ गांवाशिवाला गेले तर त्यांच्या मित्रपरिवारास उदासवाणें वाटावे. हरिभाऊ मित्रमंडळींची केवळ रंगदेवताच होते.

## विसरभोळेपणा.

हरिभाऊ विसरभोळे असत. कदाचित् त्यांच्यामागें अनेक कामांचा व्याप असल्यामुळें त्यांच्या अंगीं हा गुण आला असेल. पण एखादे वेळेला त्यांच्या विसरभोळेपणाचा अगदी कडेलोट होऊन जाई! एकदां आपले स्नेही रा. वासुदेव गोविंद आपटे यांना त्यांनीं जेवावयास बोलाविलें होतें. त्याप्रमाणें वासुदेवराव आनंदाश्रमांत आले. पण त्यापूर्वीच हरिभाऊ जेवून बसले होते. वासुदेवरावांना पाहतांच एकदम आठवण होऊन ते खालीं गेले. त्याची त्यांनी अर्थातच जेवणाची तजवीज केली व आपणही त्यांच्या पंक्तीस बसले. नंतर त्यांना खरा प्रकार काय झाला तो सांगितला!

## लहरी स्वभाव.

आनंदाश्रमांत त्यांच्या बसावयाच्या जागा दोनतीन असत; त्या सर्व ठिकाणी टेबल, खुर्ची, पुस्तकें व लिहावयाचें सामान जय्यत असे. पण या सर्वांची मांडणी आतां पाहिली तशीच चार तासांनी राहील याचा कांही भरंवसा नसून चार तासांपूर्वी जें टेबल दक्षिणोत्तर असावयाचें तेंच पूर्वपश्चिम व्हावयाचें! जीं बुकें हरिभाऊंच्या समोर होतीं, तीं त्यांच्या पाठीमागें जावयाचीं, व पाठीमागचीं पुढें यावयाचीं! इतर वस्तूंतही अशीच क्रांति घडून आलेली दिसावयाची. ही नवीन व्यवस्थाही केव्हां बदलेल हेंही सांगवत नसे!

खुर्चीनच डेस्काची सोय कशी असावी, टेबलालाच खुर्ची कशी जोडावी हे विचार त्यांच्या मनामध्ये आले की, स्वतः प्लान तयार करून ते तशी सोय तांबडतोब करून घ्यावयाचे. लिहिण्याच्या सामानसुमानासंबंधांतही त्यांची हीच स्थिति असे. अनेक प्रकारच्या लांकडी पेन्सिली, नानाप्रकारची फाऊंटन पेनें,

भिन्न भिन्न टीपकागद, वेगवेगळ्या प्रतीचे नोटपेपर व लिफाफे, लहान मोठी अनेक पॅडस् वगैरेंचा त्यांच्याजवळ मोठा संग्रह असे. आणि एक वस्तु आठ दहा दिवस वापरली, कीं तिचा कंटाळा यावा, दुसरी विशेष सुबक असावी अशी त्यांना इच्छा उत्पन्न होऊन ती त्यांनीं खरेदी करावी, असा त्यांचा स्वभावच बनला होता.

अमुक एक गोष्ट करावयाची असें त्यांच्या मनांत आलें की ती झाल्या-शिवाय त्यांच्या चित्ताला चैन पडावयाचे नाही. दुपारीं ऐन बारा वाजता त्याना एखादी वस्तु पाहिजे असली आणि बाजारात पाठविण्यास जवळ कोणी माणूस नाही अशी स्थिति असली तर हरिभाऊ स्वतः जाऊन ती वस्तु आणा-वयाचे ! रात्री बारा वाजतां हरिभाऊ जागे झाले आणि एखाद्या पुस्तकाची त्यांना आठवण झाली तर दिवा लावून तावडतोब तिसऱ्या मजल्यावर जावया-चे व तें पुस्तक आणावयाचें. "लहानपणापासून माझ्या मनाची प्रवृत्तिच काही चमत्कारिक ! जें एकदां करावयाचें असें मनाने घेतले तें करून टाकल्या-खेरीज मनाला समाधान वाटावयाचें नाही. एकदा तें हातून घडलें म्हणजे मनाला पूर्ण समाधान होऊन कृतकृत्य झालेसे वाटावयाचें" हें जें 'मी' कादंबरी-तील नायकाचें वर्णन त्यांनी दिलें आहे तें त्याना तंतोतंत लागूं पडते. वाङ्मय क्षेत्रात त्यांची कल्पनाशक्ति जशी तल्लख होती तशीच ती सामान्य व्यवहारांतही होती. फरक इतकाच की, त्या क्षेत्रात आपल्या कल्पनाशक्तीचा प्रवाह कोणत्या दिशेनें काढावयाचा ह्याबद्दल त्याच्या मनाचा एकदां निश्चय झाला की तो सहसा फिरत नसे आणि व्यवहारात म्हणजे वस्तूंच्या व वस्तुरचनेच्या निवडी-संबंधांत त्यांचा होणारा निश्चय केव्हा फिरेल याचा भरंवसा नसे.

## नादी नारायण !

'मी'ला आपल्या वडिलाच्या खोलींत लखोटा सांपडला त्या वेळेस त्याला अक्षर-ओळखही नव्हती. फार काय, पण लखोटा फोडावयाचा कसा हें समजण्या-इतकेंहि त्याचें वय नव्हते. पण कित्येक दिवसपर्यंत त्या लखोट्यानें त्याला इतकें वेडावून सोडलें होतें की एक क्षणभरही तो दृष्टीआड झाला की त्याला चैन पडावयाचें नाही । नादीपणाची ही जी बहार हरिभाऊंनीं आपल्या कादंबरीत वर्णन केली आहे, ती करण्याचे कामी स्वतःचेच चित्र त्याना पुष्कळ अंशीं उपयोगी पडले असावें असें वाटतें. 'पण लक्षांत कोण घेतो ?' मधील यमुनेच्या

दादाला हरिभाऊनी "नादी नारायण" म्हटलें आहे. त्यावेळी त्याना हरिनारायणाचेच स्मरण झालें असलें पाहिजे !

## पोषाकाच्या तऱ्हा.

हा त्यांचा स्वभाव त्यांच्या पोषाकातही दिसत असे. त्यांचे कपडे अगदी साधेच असत त्याना छानछुकीची केव्हाही आवड नसे. त्यांचा पोषाख, त्याची रहाणी, किंबहुना त्यांच्या कादंबऱ्यातील भाषा या सर्वांतच त्यांचा साधेपणा पूर्णपणे प्रतिबिंबित झालेला दिसतो. त्यांचे कपडे साधेच असत. बाराबंदी आणि तीहि बहुधा खादीची त्यांच्या अंगाशी आजन्म लगटलेली असे. त्यांच्या एकंदर पोषाखात साधेपणा हा गुण सामान्य असे. पण त्यातही पहाणाराचे क्षणभर मनरंजन व्हावे अशा तऱ्हा असत.

निरनिराळ्या शिलईचे सद्रे, शार्ट कोट, जाकिटे यांची हरिभाऊंच्या जवळ रेलचेल असे. कपड्यात अमुक ठिकाणी सुधारणा झाली पाहिजे असे त्यांच्या मनात आले की, तो लागलीच दुरुस्तीला गेलाच म्हणून समजावें ! पाटसकराच्या येथील माणूस कपडे बेतावयास आला म्हणजे या खेपेस हरिभाऊंची नवीन टूम काय निघते याबद्दल तो उत्सुक असावयाचा आणि हरिभाऊनी त्याची उत्सुकता निष्फळ केली असे प्रसंग एकंदरीनें क्वचितच असत ! हरिभाऊंच्या कपड्यांना खिसे मनस्वी असत. त्यांच्या कपड्यांना खिशाचेच अस्तर असे असेंही म्हटले असता अतिशयोक्ति होणार नाही !

एकदा त्यांच्या पायात उपरणें अडकून त्याना ठेंच लागली. तेव्हापासून पुनः त्यांनी उपरणें अंगावर घेतलें नाहीं !

## अंगावरील अवडंबर.

एक पाती, दुपाती, चार पाती, असे लहान मोठे दोन तीन चाकू, पाच पाच निरनिराळ्या रंगाच्या पेन्सिली, एक दोन फाऊंटन पेनें, लोकांकडून आलेली पाच चार पत्रें, कोरी कार्डे, पाकिटें, तिकिटें, मेणबत्तीचा तुकडा, सीलची लाख, काड्यांची पेटी वगैरे जिनसा त्यांच्या नेहमी अंगावर असावयाच्या ! ते प्रवासाला निघाले म्हणजे या अवडंबरात आणखीही भर पडावयाची ! स्टेशनवर हरिभाऊ हमाल करावयास लागले म्हणजे "येवढं अगडबंब ओझें अंगावर वागविणारास आपला बाडबिछाना सहज खाकेंत मारून नेता येईल. त्याला हमाल कशाला पाहिजे !" असेहि उद्गार त्यांच्या एखाद्या निकटवर्ती स्नेह्याच्या तोंडून निघावयाचे !

आंतून मऱ्हें जाकीट घेऊन या असें त्यांनीं एखाद्यास सांगितलें आणि त्यानें तें एरव्हींच्या जाकिटाच्या कल्पनेनेंच उचललें तर त्याच्या हातास एकदम अचका बसल्याशिवाय राहणार नाहीं इतकें तें भारदस्त असे ! पण इतकेंही असून त्यांची राहणी अगदीं साधी असे. इतकी कीं त्यांना उत्सुकतेने पहावयास आलेल्या माणसास "हेच का हरिभाऊ" असे वाटल्याशिवाय रहात नसे.

त्यांच्या इतर व्यवसायांत व वाचनांतही हा लहरीपणा दिसल्याशिवाय रहात नसे. विशेषतः, आपल्या पूर्व वयांत त्यांनी होमिओपाथी, फोटोग्राफी वगैरे कलांचे नाद केलेले आहेत. जो ज्या वेळेला नाद लागेल त्या वेळी त्याशिवाय दुसरें कांहीं करावयाचें नाहीं आणि तो एकदां सुटला म्हणजे त्याकडे पुन्हा ढुंकून पहावयाचें नाहीं अशी त्यांची स्थिति असे. फोटोग्राफीचा नाद लागला कीं त्याचे ग्रंथ, त्याचीं उपकरणें व स्वतः हे निरनिराळ्या माणसांचे निरनिराळे घेतलेले फोटो यांची गर्दी त्यांच्या खोलींत दिसावयाची ! आल्या गेल्या प्रत्येक माणसाबरोबर याचसंबंधानें त्यांचें बोलणें व्हावयाचें ! झालें, तो नाद सुटला कीं ते ग्रंथ, ती सर्व सामुग्री वर्षानुवर्ष धूळ खात पडली तरी हरिभाऊ तिचा शोध करावयाचे नाहीत.

वाचनाची त्यांची तऱ्हा अशीच असे. जो विषय किंवा विषयाची शाखा वाचून काढण्याची त्यांची लहर येईल त्या वेळीं त्या विषयाशिवाय दुसरें पुस्तक त्यांच्या हातीं कित्येक दिवस दिसावयाचें नाहीं. पुस्तकखरेदीही या लहरीला पोषक अशीच असावयाची !

## परस्परविरोधी गुण.

त्यांच्या स्वभावांत स्थिरता व अस्थिरता, ढिलाई व निश्चय यांचे विलक्षण संमिश्रण झालेलें दिसे. एखादी गोष्ट मनांत आली कीं ती घडेल केव्हां असें त्यांना होऊन जात असे. तर इतर कित्येक बाबतींत त्यांची विलक्षण दिरंगाई दिसून येत असे. जे काम केवळ पांच मिनिटांत व्हावयाचें तें करण्यास त्यांना पांच दिवस, कित्येक वेळां पांच महिनेही लागत !

त्यांचा स्वभाव कांहीं बाबतींत अगदीं ढिला असे तर कांहीं बाबतींत ते पराकाष्ठेचा निग्रह दाखवीत. सुमारें १७।१८ वर्षांच्या वयांत त्यांना विड्या ओढण्याचें व्यसन लागलें. झालें, थोड्याच दिवसांत संबंध जुडगे पेटविण्यापर्यंत

त्याची मजल गेली. पण हें व्यसन चांगलें नाही, असा त्यांच्या मनांत विवेक येनाच त्यांनी या व्यसनाचा पाश कायमचाच तोडून टाकला.

लहानपणी त्यांना कांदा लसूण खाण्याची विशेष आवड असे. पण या त्यांच्या आवडीबद्दल त्यांच्या वडिलांच्या मावशीनें तिरस्कार दाखवितांच त्यांनी या वस्तूंचा तात्काळ त्याग केला. आणि पुढील ४० वर्षांच्या आयुष्य-क्रमांत त्यांनी या वस्तूंचा आपल्याला केव्हांही संपर्क होऊं दिला नाही !

मधून मधून ते तपकीर ओढीत असत. पण हें व्यसन आवांक्याबाहेर जाऊं लागलें की ते तें तावडतोब सोडून देत.

## भिडस्तपणा.

कादंबऱ्यांत लुच्चया लफंग्यांची जी शब्दचित्रें त्यांनी रेखाटली आहेत त्यां-वरून हरिभाऊ मोठे धूर्त असावेत, त्यांना फसविणें किंवा नादी लावणें कोणाला शक्य नसले पाहिजे असें वाटे. पण वस्तुस्थिति तशी नव्हती. मनुष्याची लबाडी यदाकदाचित् त्यांना कळली तरी त्यांचा भिडस्तपणा इतका कांही विलक्षण होता की, ते पुष्कळ वेळा समजून उमजूनसुद्धा फसले जात असावे.

भिडस्तपणामुळे त्यांचे विशेषतः वेळाचे फार नुकसान होई. पुष्कळ निरु-द्योगी माणसे त्यांची निष्कारण भेट घेऊन त्यांचा हवा तसा वेळ घेत. पुष्कळ नाद असतील, पण हा चकाटपिटीचा नाद मोठा कठीण असें ते नेहमीं म्हणत असत. पण भिडस्तपणामुळ ते या नादांत गोवले जाऊन दिवसांतून कांही वेळ अशा रीतीनें घालविणें त्यांचे व्यसनच होऊन बसलें होतें ! मनुष्याने आयुष्यांत ' नाही म्हणण्याची कला' शिकलें पाहिजे म्हणजे त्याचे पुष्कळसें नुकसान वाचेल असे ते नेहमी म्हणत असत. जो कोणी आला त्याचा परामर्ष घेत बसणें म्हणजे आपल्या वेळाची कांही किंमत नाही असें दाखविणे होय ही त्यांना जाणीव होती. पण तिचा अखेरपर्यंत कांही उपयोग झाला नाही !

## निरीक्षणशक्ति.

पण हा सर्व काळ अगदींच वायां जात असे असें वाटत नाही. त्यांची निरिक्षिण-शक्ति हृदयक्रियेप्रमाणेंच एकसारखी चालत असे. ते कोणाशीहि बोलत असले किंवा कांहीही करीत असले तरी त्यांची ही शक्ति कधीहि स्वस्थ नसे. त्यांच्या मेंदूवर अनेक गोष्टींचे ओझें असे. बाकीचें ओझें सर्व वर वर असावयाचें, अगदी मेंदूशी लगट कर-णारा बोजा म्हणजे कादंबऱ्यांच्या कथानकाचाच होय. वरचे कपडे थोडे मळकट

असले तरी चालतील पण अंगाबरोबर असलेला कपडा स्वच्छ असला पाहिजे, त्याप्रमाणे इतर कोणताही व्याप असला तरी आपलीं कथानकें परीटघडीसारखीं स्वच्छ ठेवण्याचा त्यांचा प्रयत्न असे. आणि कथानकास परिपोषक अशी सामुग्री जमविण्यास त्यांची निरीक्षणशक्ति आल्या गेल्याचा समाचार घेतल्याशिवाय कधींही राहात नसे.

पुष्कळ वेळा एखाद्याशीं बोलतांना त्याच्या चेहेऱ्याचें, स्वभावाचें, व अंतर्गत विकाराचे ते सूक्ष्म निरीक्षण करीत असावे असे वाटे. असें ते निरखून पाहूं लागले म्हणजे " पहा हो मला एखाद्या कादंबरीत बिंदुंबरींत उतरून घ्याल " असें त्यांच्या निकट सहवासांतील माणसें त्याना विनोदानें म्हणत असत. आणि त्यात अर्थ नव्हता असेंहि नाहीं.

## वस्तुसृष्टींतील भूमिका.

'पण लक्ष्यांत कोण घेतो'मधील शंकर मामंजी, मायेच्या बाजारांतील दिगंबर-पंत व मोरमास्तर, भयंकर दिव्यांतील सदुनाना, प्रो. डर्यांडी व काकासाहेब, यशवतरावमधील रावबहादूर आडमुठे, कर्मयोगांतील भाऊसाहेब ही पात्रे हरि-भाऊंनी अशीच आपल्या निरीक्षणशक्तीनें टिपून घेतलेली होत. ही केवळ मासल्याकरितांच दिली आहेत. पुणें शहरांतील गेल्या दोन पिढ्यांमधील निवडक व्यक्तींची ज्याना माहिती आहे त्यांना हरिभाऊंच्या कादंबऱ्यांतील निरनिराळ्या भूमिका पाहून हे अमुक गृहस्थ, हे अमुक गृहस्थ अशी पटापट बोटे दाखविता येतील !

## नाकाला वास येत नव्हता.

हरिभाऊंच्या कादंबऱ्यांत अश्लील किंवा शिष्ट समाजात उच्चारता न येईल असा एखादाही शब्द सांपडणें कठीण पडेल. वाङ्मयसृष्टींतील त्यांचें घ्राणेंद्रिय इतकें तीक्ष्ण असे, पण हरिभाऊंच्या नाकाला मुळींच वास येत नसे! कै. गोपाळ राव आगरकर यांच्याही नाकाला वास येत नसे. तेव्हां ते एकदां हरिभाऊंना म्हणाले, " हरिभाऊ, आपल्या नाकांना वास नाहीं म्हणून आपल्याला वाईट वाटण्याचें कांहीं कारण नाही. कोणत्या दिशेनें कोण प्राणी येतो याची चाहूल घेण्याक-रितां पशूंना कान हलविण्याची शक्ति दिली आहे, माणसानाही ती तशी होती. पण पुढें समाजसंघटनेनें रहाण्याचा जसजसा प्रचार वाढत गेला तसतसे या शक्तीचें कारण उरलें नाहीं. म्हणून माणसांतील ही शक्ति नाहीशी झाली. वास

हाही संकट ओळखण्याचे एक साधन आहे. तें पशूंना असणें अर्थातच जरूर आहे. पण माणसाला त्याची आता जरूरी नाहीं तेव्हा हेंही माणसाचें इंद्रिय नाहीसे होणार असें स्पेन्सर म्हणतो. याची प्रचिती तुम्हांआम्हाला येत आहे !"

माणसाला कान हलविण्याची शक्ति होती, याचा पुरावा या पुणें शहरांत आजमित्तीसही पहावयास सापडेल. येथील एका सन्मान्य पेन्शनर गृहस्थांना कान कसे हलविता येतात हें पुष्कळांना माहीत असेल !

## विलक्षण स्वाभिमान.

हरिभाऊ भिडस्त असून तसेच ते स्वाभिमानीहि असत. त्यांनीं इतक्या कादंबऱ्या केल्या, गोष्टी लिहिल्या आणि इतरही लेख प्रसिद्ध केले, पण त्यापैकी कोणताही ग्रंथ कोण्या सरदारनिकास, जहागिरदारास किंवा एखाद्या लक्ष्मीपुत्रास त्यांनी अर्पण केला नाही. तसा क्रम त्यांनी स्वीकारला असता तर त्यांना पैशाचीही चांगली प्राप्ति होण्यास हरकत नव्हती. पण त्यांनी तसें कधीहि केले नाही, हें त्यांच्या स्वाभिमानाचे द्योतक होय. त्यांनी आपली सर्व पुस्तकें आपले वडील, आपले चुलते व आपले कित्येक जिवलग स्नेही यांनाच अर्पण केली आहेत. या स्वाभिमानाचा कित्येक वेळां अतिरेकही होई. ते आपली पुस्तके अभिप्राया-करितां कधीही पाठवीत नसत. कारण लोकांच्या चांगल्या अभिप्रायाची आपल्या पुस्तकाच्या खपास मदत घेणे हेंहि त्यांना कमीपणाचे वाटे !

# प्रकरण आठवें.

## अवांतर लेखनव्यवसाय.

### मनावर ठसा उमटत असे.

कोणताही विशिष्ट प्रसंग हरिभाऊंनी पाहिला कीं, त्याचा ठसा त्यांच्या मनावर तावडतोब उमटे. एखादा प्रसंग त्यांनी पाहिला की, ता कथेच्या हकीकतीच्या रूपानें किंवा गोष्टीच्या रूपानें लिहून काढल्याशिवाय त्यांना चैन पडत नसे. १८९९ सालच्या प्लेगमध्यें त्यांनी गोरगरिबांना मदत देण्याचें फार चांगलें काम केलें. कोणाला औषधोपचाराची मदत पाहिजे हे पाहण्यासाठी ते घरोघर हिंडत व ज्याला जी मदत लागेल ती त्याला मिळावी अशी तजवीज करीत. अनाथ प्रेताची तजवीज लावण्याकरिता त्यांनी या वेळी पगारी माणसें हि ठेविली होती. ते प्लेगच्या दिवसात सहसा बाहेर रहावयाला जात नसत. यामुळें प्लेगच्या दिवसातील येथील स्थिति त्यांच्या चांगली दृष्टोत्पत्तीस येई. प्लेगच्या दिवसात येथील लोकांचे जे हाल झाले, कित्येक कुटुंबाची जी हलाखी झाली, ती पाहून त्यांचे हृदय अर्थातच भडभडून आलें. त्यांची "कसे दिवस गेले" ही गोष्ट त्यांच्या हृदयातील या कालवाकालवीची स्पष्ट साक्ष पटविते. पुण्याच्या प्लेगची उद्वेगजनक स्थिति या वेळी पुष्कळांनी पाहिली असेल व इतरांनी ऐकली असेल. पण ' कसे दिवस गेले ' या गोष्टीनें लोकांच्या मनात त्या कहराचें, जें हृदय विदारून सोडणारे चित्र उभें राहील तें दुसरे कशानेंहि राहणार नाहीं.

### काळ तर मोठा कठिण आला.

त्याचप्रमाणें, 'काळ तर मोठा कठिण आला' या नावाची १८९७ साली त्यांनी दुष्काळासंबंधानें जी गोष्ट लिहिली तिनेंही एके काळी मोठी खळबळ उडवून दिली होती. या गोष्टीचें " रामजी ट्रॅजेडी ऑफ इंडियन फॅमिन " असें स्वतः हरिभाऊंनींच इंग्रजींत भाषांतर केलें. या पुस्तकावर पायोनिअरने खूप झोड उठविली होती, या एकाच गोष्टीवरून त्यांच्या महत्त्वाची कोणासही कल्पना येण्यासारखी आहे. त्यावेळीं मुंबईस मि. चेंबर्स यांच्या संपादकत्वाखालीं चॅंप-

यन नावाचें पत्र निघत असे. त्यांत संपादकांनीं या पुस्तकाची विशेष प्रशंसा केली आहे. दुष्काळामुळें गोरगरिबांची किती शोचनीय स्थिति होते याचें चित्र यांत हरिभाऊंनीं फारच हृदयद्रावक रीतीनें लिहिलें आहे.

## चमत्कार करू शकतील.

या गोष्टिसंबंधानें 'कादंबरी' या आपल्या एका लेखांत लिहितांना "पुढील १०।२० वर्षांत हे ( हरिभाऊ ) कदाचित् सध्यांच्या वाचकांच्या स्वप्नींही नाहींत असे स्वतंत्र चमत्कार करूं शकतील असें त्यांच्या रामजी या गोष्टीवरून वाटतें." असे विश्वनाथ काशिनाथ राजवाडे यांनी उद्गार काढले आहेत.

कोणाची स्तुति करण्यासंबधात कंजुषपणाबद्दलच राजवाड्यांची प्रसिद्धी आहे. रामजीच्या गोष्टानें त्यांच्याही तोंडून हे उद्गार निघाले, हा चमत्कार या गोष्टीच्या कर्त्यास भूषणावह नाहीं असें कोण म्हणेल ?

## अवांतर माल.

हरिभाऊंची निरीक्षणशक्ति अष्टौप्रहर काम करीत असल्यामुळें एकट्या कादंबऱ्यांचा व्याप त्या शक्तीस पुरा पडत नसे. कारखान्यांत मुख्य मालाबरोबर जसे अवांतर ( bye products) जिन्नस निघतात त्याप्रमाणेंच इकडे कादंबऱ्या चालू असताच त्याबरोबरच असल्या इतर गोष्टी व निबंध हरिभाऊ लिहीत असत.

## सद्यःस्थितिच श्रेष्ठावली पाहिजे.

हरिभाऊंची निरीक्षणशक्ति जशी बहुविध विषय आकलन करण्यास समर्थ होती त्याप्रमाणें त्यांचे वाचनही अनेक विषय आपल्या कक्षेंत आणणारें होतें. हरिभाऊंसारखा चौरस बहुश्रुतपणा फारच थोडक्यांत सापडेल. मिल्, मोर्ले, स्पेन्सर, वगैरे ग्रंथकार, टेनिसन्, वर्डस्वर्थ, बायरन्, ब्राउनिंग, आदिकरून-कवि, ग्रीन, गिबन् प्रभृति इतिहासकार, डिकन्स, स्कॉट, जेन ऑस्टेन, जॉर्ज इलियट, थॅकरे वगैरे कादंबरीकार यांचे ग्रंथ त्यांना विशेष अवगत असत. या ग्रंथकारांपैकी एखाद्याच्या ग्रंथांतील विशेष महत्त्वाचा किंवा मनोहर| भाग त्यांच्या वाचण्यांत आला तर पुष्कळ वेळां त्यावर एखादा सुंदर निबंध लिहून ते एखाद्या संस्थेपुढें वाचीत. सारांश, आपणास जें जें काय कळेल तें बहुजनसमाजास सांगून त्यांस शहाणें करावें हा समर्थांचा उपदेश हरिभाऊ तंतोतंत आचरणांत आणीत. " साधारण लोकांची सद्यःस्थितिच श्रेष्ठावली पाहिजे. ज्या आम्हांला

लोकांच्यामुळेंच ज्ञान मिळतें त्या आम्ही तेंच ज्ञान आमच्या हातीं केवळ ठेव समजून तें त्यांना पोहोंचतें केलें पाहिजे. ( मं. प्र० ६७ ). हें तत्त्व हरिभाऊंनी आजन्म अमलांत आणलें.

## निरनिराळ्या विषयांवरील निबंध.

पूर्वी पुण्यास फ्रेंडस लिबरल असोसिएशन या नांवाची संस्था होती त्यांत "Philosophy of Fiction" "Realism in Fiction" व "Teaching of the Bhagwadgita" या तीन विषयांवर हरिभाऊंची व्याख्यानें झाली. त्याचप्रमाणे फर्ग्युसन कॉलेजच्या विद्यार्थ्यांपुढें "Beauty" व "Joy of Life" या विषयावर त्यांनी व्याख्यानें दिली. यांपैकीं दुसरें व्याख्यान कॉलेजच्या वाढदिवसाच्या एका समारंभांत त्यांनीं दिले होतें. डेक्कन कॉलेजच्या विद्यार्थ्यांपुढे त्यांचे " What is a Nation " ह्या विषयावर व्याख्यान झालें. त्यावेळी प्रिन्सिपाल बेन यांनी या व्याख्यानाची विशेष प्रशंसा केली. पुणे येथील लिटररी अँन्ड सायंटिफिक क्लबपुढे " John Stuart Mill as revealed in his Letters " व "Ethics of Mahabharat" या विषयावर त्यांचीं व्याख्यानें झाली. ठाणें येथील ग्रंथसंग्रहालयाच्या समारंभाच्या वेळी "मराठी वाङ्मयाचा अभ्यास " या विषयावरील त्याचें झालेलें व्याख्यान सुप्रसिद्धच आहे. मुंबई येथील हेमंत व्याख्यानमालेंत प्राचीन काळची शस्त्रास्त्रें व हास्य या दोन विषयांवर त्यांची निरनिराळ्या वेळी व्याख्यानें झालीं. महाराष्ट्र साहित्यपरिषदेच्या अध्यक्षस्थानावरून " विदग्ध वाङ्मय " या विषयावर त्यांचें झालेले व्याख्यान अगदी अलीकडील असल्यामुळे सर्वश्रुतच आहे. हें त्यांचें व्याख्यान सर्वोत्कृष्ट आहे. विदग्ध वाङ्मयाचें इतकें समर्पक, पण सोप्या व साध्या शब्दांत केलेले विवेचन निदान मराठींत तरी अन्यत्र कोठेंही सांपडणार नाहीं.

ही सर्व व्याख्यानें म्हणजे त्यांच्या विविध वाचनव्यासंगाचें सारसर्वस्वच होत.

## भास कवीचे ग्रंथ.

भास कवीचे ग्रंथ अलीकडेच प्रकाशित झाले. त्यांचीही भाषांतरें हरिभाऊंनी करमणुकींत प्रसिद्ध केली आहेत. मूळ नाटकें जशी गद्यपद्यात्मक आहेत, तशीच ती हरिभाऊंनी मराठींत आणून सोडली आहेत. मूळच्या सौंदर्याची व सौकर्याची हानी न होता भाषांतर कसें करिता येतें याचे मासले या भाषांतरांत ठिकठिकाणी सांपडण्यासारखे आहेत.

याशिवाय तुकाराम, ज्ञानदेव आदिकरून महाराष्ट्र कवींवरही हरिभाऊंचे कित्येक स्फुट लेख प्रसिद्ध झाले आहेत. महायुद्धात श्रापनेल, होविटझर, ट्रेंचमार्टर वगैरे जी शस्त्रास्त्रें उपयोगात आली त्यांचें समानार्थक शब्द महाभारतांत सापडतात की काय या दृष्टीने त्यांनीं त्या ग्रंथाचें परिशीलन करून तसे काही शब्द व वर्णनें निवडूनही काढली होती. व यावर एक निबंध लिहिण्याचाही त्याचा विचार होता. हरिभाऊंनी ज्ञानेश्वरीचा एक कोशही तयार केला असून तो कदाचित् लवकर प्रसिद्धही होईल.

## तीनही गुणांचा संगम.

असामान्य ग्रंथकार म्हणवून घेण्यास वैदग्ध्य व वैपुल्य या दोन गुणाची आवश्यकता असते. पण हरिभाऊंनी त्यास वैचित्र्याचीही जोड दिली. या तिन्ही गुणाचा एकत्र संगम झालेली हरिभाऊसारखी उदाहरणें क्वचितच सापडतील. आपल्या समाजास उन्नतिपदास नेणाऱ्या त्याच्या कादंबऱ्याचा लौकिक निरंतर राहील. पण त्याचे अवांतर लेख व इतर गोष्टी घेतल्या तरी त्या एखाद्या विद्वान् व विद्याव्यासंगी माणसाच्या आजन्म चालणाऱ्या लेखनव्यवसायास पुरून त्याची कीर्ति पश्चात् उरविण्यासारख्या आहेत. यावरून हरिभाऊंचा लेखन व्यवसाय व तो ज्या उगमातून निघाला ती त्यांची बुद्धिमत्ता, निरीक्षणशक्ति व व्यासग ही किती प्रचंड होती याची कल्पना येईल. एखादी टोलेजंग इमारत बांधून उरलेल्या लांकूडफांट्यात व राड्यारोड्यात १०१५ लहान लहान घरं सहज व्हावी त्याप्रमाणें हरिभाऊंच्या या अवांतर लेखनक्रियेनेंच ग्रंथकार होण्याची महत्त्वाकांक्षा बाळगणाऱ्या ५१४ गृहस्थांच्या कीर्तिरूप इमारती सहज उभारल्या जातील !

## हस्तें-परहस्तेंमधील अंतर.

हरिभाऊंनी हा सगळा लेखनव्यवसाय केला तो सर्व स्वतः लिहून केला. दुसऱ्याला मजकूर सागून तो लिहून काढण्याची त्याना सवय नसे आणि तें त्यांना बरेंही वाटत नसे. ज्या अंतःकरणास स्फूर्ति झाली, त्याच हाताने मजकूर लिहून निघाला पाहिजे, हस्तें आणि परहस्तें या मध्यें जें अंतर तेंच स्वतः मजकूर लिहिण्यात व दुसऱ्याकडून लिहविण्यांत आहे, असें त्याना वाटत असावे. यासंबंधानें रा. रेंदाळकर म्हणतात, हरिभाऊंची लेखणी फार चपल असे, ती नाना विषयांवर चाले. त्याचप्रमाणें ते फार झपाट्याने लिहीत. मात्र

अगदी आयत्या वेळाशिवाय त्याच्या हातून काही व्हावयाचे नाही, हे ठरलेलें! आरंभापासून त्यांना आपलें सगळे लेखन स्वतः करण्याची सवय. त्यानी लेखक ठेविलाच नाही. काही अडचणीमुळे त्याना लिहिणें अशक्य झाले, आणि दुसऱ्या-ला तोंडी मजकूर सांगण्याचा प्रसंग आला, तर तें त्याना बरे वाटत नसे. त्यांना दिसत नव्हतें त्यावेळी एकदा मी " सूर्यग्रहण " त्यांना वाचून दाखवीत होतो. माता रणदेवी नदीतीरावरील झाडाखाली बसली असता तिच्या पुत्राचा घोडा तिच्या मोहाने तिच्याकडे धावत आला; पण त्या नीचाने—कीर्तिसिंगानें—त्याच्या नाकाडावर मुष्टिप्रहार करून त्याला ठार मारले. हा प्रसंग इतका करुणरसप्रधान आहे की, मला तर थांबावेच लागत होते. पण हरिभाऊंही डोळे पुशीत होते. नंतर ते म्हणाले, " असले प्रसंग मला दुसऱ्याला मजकूर सांगून कधीहि वठ-विता आले नसते! अगदी एकांतात मी एकटा असतांच असले प्रसंग माझ्या हातून निर्माण झालें आहेत. "

## हातावरील प्रपंच.

हरिभाऊंनी आपली सर्व पुस्तकें, गोष्टी, लेख व निबंध ही रोज रोज थोडी थोडी लिहून समाप्त केली असेंही नाही कारण, पद्धतशीरपणाने काम करणे हें त्याच्या स्वभावास केव्हाही मानीत नव्हतें. मजकूर लिहिण्यासंबधात त्याचा अगदी हातावरचा प्रपंच असे. अगदी गळ्याशी आले म्हणजे ते लिहावयास बसत. ही स्थिति अगदी मधली स्थितीपासून तो अखेरपर्यंत म्हणजे अगदी ३५ वर्षं एकसारखी चालू असे रोज थोडें लिहून शनिवारच्या करमणुकीकरिता ते मजकूर तयार करून ठेवण्याचा बेत करीत. पण तो केव्हांच फलद्रूप झाला नाही. हरि-भाऊंचे असे फलद्रूप न झालेले बेत किती तरी सांपडतील. " आपल्या बालपणापासून आपल्या एकंदर चारित्राचें परीक्षण करीत गेलें तर मला वाटतें, फसलेल्या बेताची जी रास दिसेल ती सिद्ध झालेल्या बेतापेक्षा किती तरी प्रचंड असेल! " हे 'मी'च्या तोंडचे उद्गार हरिभाऊंचा स्वानुभवच सांगत असले पाहिजेत. पण निदान हरिभाऊसंबंधात तरी फसले-ल्या बेताची रास वाढण्याचें कारण ते आपल्या आवाक्याबाहेर बेत करीत, हेंच असले पाहिजे.

## करमणुकीचा दिवस.

असो. शुक्रवारीं, फार झालें तर गुरुवारी पहांटे ते करमणुकीचा मजकूर लिहावयास सुरवात करीत. त्यांची बैठक मोठी दांडगी असे. आठआठ तास-

पर्यंन्त ते एकसारखे लिहीत असत. संत सखुबाई नाटक तर त्यांनी दीड दिवसांत लिहिलें!

या त्यांच्या स्वभावामुळें त्यांना रात्रीचा दिवस करूनच लिहावें लागत असे. आणि त्यांना झोप थोडी असल्यामुळे ते लवकर उठत व पहाटे मजकूर लिहिण्याच जमवीत. ग्रंथलेखनाच्या एकदर ३५ वर्षें काळापैकीं पहिल्या वीस वर्षांच्या काळांत त्यांचा हा क्रम अव्याहत चालू होता, पण पुढें दृष्टिमांद्यामुळें पहाटेचे विशेष काम करणें त्यांना अशक्य होऊन गेलें. तेव्हा दिवसाचे अनेक व्याप संभाळूनच हे सर्व काम त्यांना आटपावें लागत असे. या वेळी मनाची स्थिरता मोडण्याचे प्रसंग क्षणोक्षणीं उपस्थित होत असतांही त्यांचें लिहिण्याचें काम जसा वेळ मिळेल तसें, चालत असे.

कादंबऱ्याच्या कथानकाचें टिपण वगैरे त्याच्यापुढें केव्हांही नसे. अगदी करमणूक छापण्याचा दिवस आला की आर्यभूषण छापखान्यांतील माणसें मजकुराकरिता आनंदाश्रमात सकाळपासून खेपा घालूं लागावयाची. इकडे नित्याप्रमाणें इतर मंडळी कामकाजानिमित्त किंवा पुष्कळ वेळां निष्कारणच भेटावयास येण्याचा सपाटा चालूच असावयाचा. त्यांतच आनंदाश्रमाचे कारकून सह्यांना कागद आणावयाचे. इतक्यांत अमुक वाजतां अमक्याला भेटावयाला जावयाचें कबूल केलें आहे याची त्यांना आठवण होऊन ते बाहेर जाऊन यावयाचें. जेवणाची तयारी झाली म्हणून खालून वरचेवर निरोप यावयाचे. अशा सर्व गोंधळांत हरिभाऊंच्या लिहिण्यास सुरुवात व्हावयाची. पण त्यांचें डोकें शांत असे कीं या सर्व भगभगांचा समाचार घेऊन ते संध्याकाळी मजकूर पुरा करावयाचेच!

टाकातून एकदा अक्षरे गेलीं, कीं, तीं बहुधा कायमच होत असत, व ५।६ तास एकसारख्या लिहिलेल्या मजकुरांत खोडाखोड साधारणतः केव्हांच दिसत नसे. एकदां मजकूर टाकांतून निघून गेला कीं तो करमणुकींत छापून आल्या, वर त्याच्यापुढे यावयाचा. मध्यतरीं रीतीप्रमाणे त्यांचेकडे प्रूफ यावयाचें. पण तें त्यांनी स्वतः पाहिल्याचे प्रसंग आलेच तर ते अपवादादाखलच होत! स्वतः लिहावयाचें, अगदीं आयत्या वेळीं लिहावयाचें व तेंही अगदीं अशा रमघाईत आणि मजकूर लिहून गेल्यानंतर पुनः हरिभाऊंची व त्याची दृष्टादृश नाही अशा स्थितींत त्यांच्या कादंबऱ्यांत

क्वचित् प्रसंगीं संविधानकाची जुळणी विसकटलेली दिसावी, किंवा कित्येक ठिकाणीं वस्तुवर्णनांतील प्रमाणशीरपणा बिघडावा, यांत कांहीं आश्चर्य नाहीं. पण असे प्रसंग एकंदरीनें थोडेच आहेत; याबद्दल मजकुराचा प्रसव होण्यापूर्वीची वरील स्थिति लक्षांत घेतां हरिभाऊंना कोणी विशेष दोष देणार नाहीं.

हरिभाऊंच्या आयुष्याच्या शेवटच्या तीस वर्षांचे म्हणजे करमणुकीच्या जन्मापासून तों अखेरपर्यंतच्या काळाचे दहा दहा वर्षांचे तीन भाग पाडले तर त्यांत प्रत्येक भागांत त्यांनी खालीलप्रमाणे ग्रंथरचना केलेली आढळते:—

| काळ | प्रकार | ग्रंथ | वर्षे |
|---|---|---|---|
| १८९० पासून १९०० | सामाजिकः— | पण लक्ष्यांत कोण घेतो | (१८९०–९३) |
| | | सगुणाबाईची आपल्या मुलीस व गोविंदरावांची आपल्या मुलास पत्रें. | (१८९१–९४) |
| | | यशवंतराव खरे. | (१८९२–९५) |
| | | मी. | (१८९३–९५) |
| | | जग हें असें आहे | (१८९७–९९) |
| | | काळ तर मोठा कठिण आला व कसे दिवस गेले. | (१८९९) |
| | ऐतिहासिकः— | म्हैसूरचा वाघ (अपूर्ण) | (१८९०–९१) |
| | | उषःकाल. | (१८९५–९७) |
| | | केवळ स्वराज्यासाठीं. | (१८९८–९९) |
| १९००—१९१० | सामाजिकः— | भयंकर दिव्य. | (१९०१–०३) |
| | | आजच (अपूर्ण). | (१९०४–०६) |
| | ऐतिहासिकः— | रूपनगरची राजकन्या. | (१९००–०२) |
| | | चंद्रगुप्त. | (१९०२–०४) |
| | | गड आला पण सिंह गेला. | (१९०३) |
| | | सूर्योदय. | (१९०५–०६) |
| | | मध्यान्ह ( अपूर्ण ). | (१९०६–०८) |
| | | सूर्यग्रहण ( अपूर्ण. ) | (१९०८–०९) |
| १९१०—१९१९ | सामाजिकः— | मायेचा बाजार. | (१९१०–१२) |
| | | कर्मयोग ( अपूर्ण ). | (१९११–१७) |
| | ऐतिहासिकः— | कालकूट ( अपूर्ण ). | (१९०९–११) |
| | | वज्राघात. | (१९१३–१५) |

हरिभाऊंनी पहिल्या दहा वर्षांत चार सामाजिक कादंबऱ्या व दोन ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिल्या, दुसऱ्या दहा वर्षांत दोन सामाजिक कादंबऱ्या लिहिल्या. त्यांतील एक अपूर्णच आहे. या काळात चार पूर्ण व दोन अपूर्ण अशा त्याना सहा ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिल्या. तिसऱ्या दहा सालीत दोन सामाजिक व दोन ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिल्या. त्यापैकी प्रत्येकांतील एक एक कादंबरी अपूर्णच आहे.

यावरून असें दिसून येते की, स. १९०० नंतर हरिभाऊंनीं भयंकर दिव्य व मायेचा बाजार या दोनच सामाजिक कादंबऱ्या लिहिल्या. त्यानंतर त्याचें लक्ष ऐतिहासिक कादंबऱ्यांकडेच विशेष असलेलें दिसते. दुसऱ्या दहा सालीत प्रायः प्रत्येक वर्षी त्यांनी एक एक ऐतिहासिक कादंबरी लिहिली आहे. त्यांतील सूर्यग्रहण हें कथानकाच्या अनुरोधानें पाहतां वस्तुतः पूर्णच झाले आहे. फक्त माध्यान्ह हीच काय ती कादंबरी अपूर्ण राहिलेली दिसते. म्हणजे दहा वर्षांच्या काळात त्यांनी सात ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिल्या.

स. १९०० नंतर हरिभाऊचे सामाजिक कादंबऱ्याकडील चित्त कमी का झालें असा साहजिकच प्रश्न उद्भवतो. त्याचे निश्चित उत्तर देणे अर्थातच शक्य नाही. या काळात सुधारणा लोकांच्या काहीशा अंगवळणी पडत चालल्या. अर्थात् सामाजिक चळवळीचा तितका जोर कमी झाला. या परिस्थितीचाही हा परिणाम असेल. पण साधारणतः असे दिसते की, समाजांतील विद्यमान व पुढील दहावीस वर्षांच्या काळातील विचारपरिवर्तन त्यानी आपल्या १९०० पूर्वीच्या कादंबऱ्यांतच चित्रित केली. या पुढच्याही काळाचा सद्यःस्थिति रेखाटीत बसणें म्हणजे समाजाचे लक्ष त्या काळाकडे वेधून त्यास सद्यःस्थितीकडे दुर्लक्ष्य करण्यास लावण्याप्रमाणे होणार आहे असा विचार त्यांच्या मनांत आला असावा. म्हणूनच ते ऐतिहासिक कादंबऱ्याकडे वळले असावेत. ऐतिहासिक कादंबऱ्याच्यायोगाने समाजास सद्यःस्थितीची व पूर्वस्थितीची तुलना करता येऊन दोहोंमधीलही चांगल्या गोष्टींचा मिलाफ करतां येतो. आजच्या आणि यापुढें पंचवीस वर्षांनी होणाऱ्या सद्यःस्थितीचे विवरण केल्यानंतर पूर्वस्थितीचे सिंहावलोकन करणेच त्याना इष्ट वाटलें असावे.

स. १९१३ सालानंतर हरिभाऊंच्या हातून फारच थोडी ग्रंथरचना झाली याचे कारण अर्थातच त्यांच्या आवडत्या मुलीच्या मृत्यूनें त्यांच्या मनःस्थैर्याचा सर्वस्वी बिघाड झाला हेंच असले पाहिजे.

---

# प्रकरण नववें.

## परीक्षेची वेळ.

### धामधुमीचा काळ.

हरिभाऊंची करमणूक निघाली त्या वेळचा काळ मोठा धामधुमीचा होता. संमतिवयाच्या कायद्यानें त्याच वेळीं मतभेदाची धुमश्चक्री माजली होती. पंडिता रमाबाईंच्या शारदासदनानें स्त्रीशिक्षणास विरोध करणाऱ्या पक्षास सुधारकांवर मारा करण्यास एक नवीन हत्यार मिळालें तें या वेळीच होय. पंचहौद्मिशनमधील चहाप्रकरण उपस्थित होऊन बेचाळिसांवर ग्रामण्य घालण्याची चळवळ कित्येक धर्माभिमान्यांनीं सुरू केली ती या वेळीच होय. स. १८९१ सालचे स्थानिक वर्तमानपत्राचे त्या वेळचे अंक पाहिले तर त्यांत वरील तीन बाबींशिवाय दुसरा विषय क्वचितच आलेला दिसेल. हरिभाऊ हे संमतिवयाच्या कायद्यास अनुकूल होते. व त्यांचे चुलते अण्णासाहेब हे प्रतिकूळ होते. आनंदाश्रमांतील तिसऱ्या मजल्यावर या बिलाविरुद्ध जोराची चर्चा चालावयाची तर दुसऱ्या मजल्यावर हरिभाऊंच्या स्नेही मंडळींत, हें बिल पास झालेंच पाहिजे, हें मत आग्रहानें प्रतिपादन करण्यांत यावयाचें. चुलतेपुतणे असे एकमेकांविरुद्ध बाजूस होते तरी त्यांच्या प्रेमभावांत यत्किंचित्‌ही व्यत्यय आला नाहीं हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. त्या वेळीं घरोघरच्या वडिलधाऱ्या माणसांनीं अशा प्रकारची सहिष्णुता दाखविली असती तर जुन्यानव्यांतील झगड्यामुळें पुणें शहरांतील ज्या कित्येक कुटुंबावर असमाधानाची व धुसफुशीची कृष्णच्छाया पसरली होती ती नाहीशी होऊन त्यामुळें सर्वांसच सुख लागलें असतें. फार कशाला, सहिष्णुतेच्या बाबतींत हरिभाऊंचे वडील अण्णासाहेबांप्रमाणेच असते तर हरिभाऊंचा जीवनक्रम बराच वेगळ्या प्रकारचा झाला असता.

### शारदासदन.

संमतिवयाच्या कायद्याप्रमाणेच शारदासदन हाही विषय त्या वेळीं तीव्र मतभेदाचा झाला होता. या सदनाच्या स्थापक पंडिता रमाबाई या मोठ्या कर्तृ-

त्ववान्, करारी व तेजस्वी बाई होत्या. हरिभाऊंना या बाईबद्दल फार आदर वाटे. स्त्रीशिक्षणाच्या कार्यास त्यांच्यासारखी विदुषी स्त्री मिळाली याबद्दल प्रगमनशील समाजास त्या वेळीं एक प्रकारें आनंद वाटला. पण हा आनंद फार वेळ टिकणारा नव्हता. कारण या बाईनीं ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेतली. असल्यामुळें त्यांच्या स्त्रीशिक्षणविषयक प्रयत्नाकडे समाज साशंक दृष्टीनें पाहूं लागला व त्यामुळें अखेर या बाईचें जें तेज मालविलें तें कायमचेंच मालविलें. हिंदु धर्मांत राहूनच पंडिताबाईनी आपलें स्वीकृत कार्य चालविलें असतें तर आज स्त्रीशिक्षणाची स्थिति आहे यापेक्षां कितीतरी पट चांगली दिसली असती. बाई मोठ्या बुद्धिवान्, कर्तृत्ववान् व करारी होत्या. यामुळें पुणें शहरातील प्रगमनशील गृहस्थांवर या बाईचें मोठें वजन असे. पण पुढें ख्रिस्तीधर्म प्रसाराकडेच त्यांचें लक्ष अधिक लागून शारदासदनांतील तुळशीचें झाड लाथेनें उडविण्यापर्यंत त्यांची मजल गेली तेव्हां कित्येक गृहस्थांना त्यांच्या संस्थेशीं असलेला आपला संबंध तोडून टाकावा लागला. हरिभाऊंनाही या बाईबद्दल पूज्य बुद्धि वाटे; पण पुढें त्यांच्या आयुष्यक्रमास वरीलप्रमाणे वळण मिळाल्यामुळें त्यांचा बाईशीं असलेला स्नेह अर्थातच कमी झाला.

## चहाप्रकरण.

तिसरी गोष्ट पंचहौद मिशनमधील चहाप्रकरण. यांतही हरिभाऊ होतेच. ज्या दिवशीं हें चहापान झालें त्या दिवशींच हरिभाऊंचे एक चुलतभाऊ वारल्यामुळें त्यांना या समारंभास हजर राहतां आलें नाहीं. तरी त्यांचें नांव बेचाळिसांत प्रसिद्ध झालेंच. मी हजर नव्हतों असें तूं प्रसिद्ध कर, असें हरिभाऊंच्या वडिलांनीं त्याना सांगितलें. पण हरिभाऊंनीं तें ऐकलें नाहीं. मी हजर नसलों तरी तेथें हजर रहाण्याचें मीं कबूल केलें होतें, त्याअर्थी आपण सांगतां त्याप्रमाणें मजकूर मला प्रसिद्ध करतां येत नाहीं असेंच त्यांनीं वडिलाना सांगितलें. वडिलांना असें सडेतोडपणाचें उत्तर देण्याचा हरिभाऊंच्या हयातीत हा येवढाच प्रसंग असला पाहिजे !

## प्रथम कुटुंबाचें निधन.

सुधारकांविरुद्ध काहूर उठण्याची पुणें शहरांत अशी जणूं काय पर्वणीच आली, त्याच सुमारास हरिभाऊंचें पहिलें कुटुंब वारलें आणि हरिभाऊंच्या परीक्षेची वेळ आली ! हरिभाऊंचे वय या वेळीं सुमारें अठ्ठावीस वर्षांचें होते. आज या

वयाचे प्रथम वर शेकडो सांपडतील. पण त्या वेळी लग्नें लवकर होत असल्यामुळे हें वय चांगले मोठ्या बिजवराचें असें गणलें जाई. हरिभाऊंच्या मातुःश्री माघ-मासांतच वारल्या. त्यांच्या प्रथम पत्नीने इहलोकची यात्रा संपविली ती याच महिन्यांत! त्यांची आवडती व एकुलती एक कन्या त्यांना शोकसागरांत लोटून याच महिन्यांत परलोकवासी झाली! त्याचप्रमाणे त्यांचे वडील व चुलते यांच्या-वरही विधुर होण्याचा प्रसंग त्यांच्या अठ्ठाविसाव्या वर्षीच आला! हें दुःखाचे प्रसंग घडून येण्याचे बाबतीत असा पद्धतशीरपणा कां असावा हें कोडें कोण उकलणार?

हरिभाऊंचें पहिले लग्न त्यांच्या वयाच्या सोळाव्या वर्षी झालें. त्यांची प्रथम पत्नी ही कै. दामोदर विद्याधर गोखले यांची कन्या होय. मथुराबाई ऊर्फ रमा-बाई या फार सालस होत्या. त्यांना तीन अपत्यें झालीं, पण त्यांपैकीं कोणीही जगलें नाहीं. तिसऱ्या बाळतपणाच्या वेळेस पहिल्या पांच दिवसांतच त्यांची तब्येत बिघडली औषधोपचार चालू होतेच. पांचव्या दिवशीं डॉक्टर प्रकृति पाहून, आतां कांहीं घाबरायास नको, म्हणून सांगून गेले आणि दोन तासांतच बाईचें देहावसान झालें! रमाबाई निवर्तल्यावर त्यांचें बालक त्यांच्या पश्चात् दोन महिनेच होतें. या प्रसंगानें हरिभाऊंना फारच दुःख झालें, हे सांगावयास नकोच.

## तिघेही विधुर झाले.

याच वेळीं हरिभाऊंच्या दोन जिवलग मित्रांच्याही बायका मरण पावल्या. त्यांपैकी एक तर हरिभाऊंच्या बायकोप्रमाणेंच बाळंतपणांत मरण पावली. तिघेही सुधारक मताचे, तेव्हां अर्थातच आतां पुढें कोणता मार्ग आक्रमावा हा प्रश्न त्यांच्या पुढें आला. घरांतली मंडळी हरिभाऊंच्या जवळ लग्नाच्या गोष्टी काढूं लागली, पण त्यांनीं, मला लग्न करावयाचें नाहीं, असें सांगितलें. हरिभाऊंचा स्वभाव घरांतल्या मंडळींना माहीत होता. तेव्हां हा आतां "नाही" म्हणतो तेव्हां खरोखरच लग्न करणार नाहीं असें वाटून सर्वांचीं अंतःकरणें दुःखित झालीं. याप्रमाणें सरासरी वर्ष गेलें तरी हरिभाऊंचा निश्चय कांहीं बदलत नाहीं असें पाहतांच घरच्या मंडळींना फार काळजी वाटूं लागली. वस्तुतः आपण सुधारकी मताचे, तेव्हां आपण वास्तविक पुनर्विवाह केला पाहिजे. बरें, तें आपल्या हातून झालें नाहीं आणि आपण जुन्या पद्धतीप्रमाणेंच लग्न केलें तरी घरांतील जुन्या-नव्यांतील झगड्यामुळें आपल्या पहिल्या बायकोस जसा त्रास झाला तसाच

दुसऱ्या बायकोसही होणार, असा विचार मनात येऊनच त्यांनीं लग्न करावयाचें नाहीं असा निश्चय केला असावा. पण या वेळी एक विशेष गोष्ट घडून आली. त्यांच्या वडिलांच्या मातुःश्री याच वेळीं आजारी पडल्या. 'मी लग्न करीन' अशी कबुली तुझ्या तोंडून आल्याशिवाय मला सुखाने मरण येणार नाहीं' असें हरिभाऊंना जवळ बोलावून आजीनें सांगितलें. झालें, हरिभाऊंना पाझर फुटला आणि " बाळपणापासून ज्यांनीं आपल्याला अत्यंत प्रेमानें वाढविलें त्यांनीं कोणत्याही गोष्टीचा हट्ट धरून अगदीं त्रागा करण्याची पाळी आणली तर आपण आपलें मन आवरून त्यांच्या इच्छेप्रमाणें करण्याला प्रवृत्त होतों हें अंतर्गूढ प्रेमामुळेंच होय " हे 'मी' चे उद्गार त्यानी अन्वर्थक केले ! त्यांचे दोन स्नेही हरिभाऊ काय करतात याचीच वाट पहात बसले होते. हरिभाऊंनी अशा रीतीनें मार्ग मोकळा करून दिल्यामुळें त्यांनीही पुनः यथाविधि गृहस्थाश्रमाचा स्वीकार केला।

## सुधारकाचें पिल्लूं.

यासंबंधांत हें जरूर ध्यानांत ठेवले पाहिजे कीं, हरिभाऊंचें मत प्रथम-पासूनच सुधारणा सावकाशीनें झाली पाहिजे असें होतें. " कोणचीहि गोष्ट सावकाशी सावकाशीने जितकी होईल, तितकी एकदम दाडगाईने होणार नाही." ( मी, प्र० ६० ) असें त्यांनी आपलें मत स्पष्ट रीतीनें प्रतिपादन केलें आहे. त्यांचें दुसरें लग्न होण्यापूर्वीच पाच वर्षे त्यांनी गणपतराव कादंबरीत " ज्या गोष्टी समाजास फार त्याज्य अशा वाटतात त्या बळजबरीने अमलात आणणे हें समाजाच्या हिताला अपायकारक आहे. त्या सावकाश व आपोआप प्रचारात आल्या म्हणजे फार हितावह होत." तरी पण स्वतःच्या वर्तनाचे हरिभाऊ केव्हा-ही समर्थन करीत नसत. याप्रसंगी थोडें धडाडीचें वर्तन आपल्या हातून होते तर फार चांगलें झालें असतें, असेंच त्यांना वाटे. यावेळी सुधारकात ते प्रमुख गणले गेले नव्हते तरी त्यांची बरीच प्रसिद्धी होती. श्रीधर विठ्ठल दाते हे तर त्याना " सुधारकाचें पिल्लूं " म्हणत ! असो. याप्रमाणें त्यांचा द्वितीय विवाह झाल्या-नंतर येथील एका धर्माभिमानी पत्रात त्याविरुद्ध टीका आलीच. हरिभाऊंचे श्वशुर रा. बळवंतराव चोळकर हे जुन्या मताचे व मोठे स्नानसंध्येशीळ असत. त्यांच्या पूजेला पाच तास लागत असत. हरिभाऊ सुधारक मताचे आहेत हें त्यांना ठाऊक होतें. पण ते यासंबंधानें बोलताना प्रो० पानसे यांजपाशीं

म्हणाले होते की "आतां जुनें काय राहिलें आहे? आतां आगगाडींत सुद्धां माणसें फराळाचे खाऊं लागली !" धर्माभिमानी पत्रांत "एका बोलक्या सुधारकांनीं बागेत हळूच जाऊन लग्न केलें, आश्चर्य हें की, एका धर्मभोळ्या व चार घटका नाक धरून बसणाऱ्या गृहस्थानें आपली ११ वर्षांची मुलगी त्याला दिली." असा मजकूर प्रसिद्ध झाला होता.

## इकडे आड आणि तिकडे विहीर.

हरिभाऊंच्या नवीन पत्नी रमाबाई या त्या वेळेच्या मानाने बऱ्याच शिकल्या होत्या. किंबहुना प्रो. पानसे यानी मुलीला चांगलें लिहितां वाचतां येतें हें पाहूनच ती पसंत केली होती. लग्न झाल्यानंतर त्यानी रमाबाईना कांही पुस्तकें वाचावयास दिलीं होती. पुस्तकें वाचून झालीं नाहीत तर लग्न परत करूं, असाही त्याना धाक घातला होता ! पण हें असें किती दिवस चालणार ! जुन्या पद्धतीचा किस्ता एकाग्रतेनें गिरविणाऱ्या दहा माणसांच्या कुटुंबात जिला धाक दाखवावयाचा सर्वांनाच अधिकार, अशा नवीन मुलीस लिहिणे वाचणें कसें चालवितां येणार ?

हरिभाऊंची वस्तुतः आनंदाश्रमात रहाण्याची सोय होती, इतकेंच नव्हे तर तेथेच त्यानीं सहकुटुंब रहावे अशी महादेव चिमणाजींची योजनाही होती. पण हरिभाऊंच्या अनिश्चयामुळें म्हणा किंवा भिडस्तपणामुळे म्हणा, त्यांच्या हातून तें झालें नाही. यामुळें "आम्हांला इकडे आड आणि तिकडे विहीर असें झाले आहे. घरच्या माणसाचीं बोलणी टाळायला जावं तर यांची मर्जी जाते, यांची संभाळावी तर त्यांची जाते" (मा प्र. ५२) असे रमाबाईनीस होऊन त्याना बराच त्रास सोसावा लागला असल्यास त्यात काही नवल नाही.

## विलक्षण भिडस्तपणा.

हरिभाऊंनी याच वेळी आनंदाश्रमात संसार थाटला असता तर वडिलांचा त्याचेवर वाईटपणा आला असता. पण हरिभाऊ वागले त्या रीतीनें तरी त्यांना वडिलाचा चांगुलपणा कोठें संपादतां आला ? हरिभाऊ इतके जपून वागत होते तरी "तो कसा कां वागेना ? आमच्या हातचा पार्थिव त्यानें लाथेनें उडवून दिला नाही म्हणजे मिळविली !" असेंच त्याचे वडील म्हणत असत. यांत त्याचा दोषही नव्हता. ते एकधोरणी असल्यामुळे कांही घेवाण देवाण करून तडजोड पाडणें त्यांच्या स्वभावाला अशक्य होतें. हरिभाऊ गाह्यात्कारीं कसेही वागले तरी त्यांचीं मतें नानासाहेबांना पूर्ण माहीत होतीं. अशा स्थितीत नुसत्या वरकरणीं वागणुकीने त्यांचें समाधान कसें व्हावें ? वडिलांच्या एकधोरणीपणाचेंच अनुकरण करून हरिभाऊंनीं आरंभापासूनच आपली वेगळी व्यवस्था ठेवली असती तर तें सर्व दृष्टीनीं श्रेयस्कर झाले असतें. पुढे काही वर्षांनी तरी त्याना असें करावें लागलेंच. असो. हरिभाऊंसारख्या जनमिळाऊ माणसाच्या हातून यापेक्षां वेगळें वर्तन झालें असतें तरच आश्चर्य होतें.

# प्रकरण दहावें.



## आनंदाश्रम.



### वस्तुसृष्टींतील अद्भुत !

हरिभाऊंचे चुलते अण्णासाहेब यांनी आनंदाश्रमावर हरिभाऊंची स्थापना केल्याचें यापूर्वीच सांगितलें आहे. ही संस्था म्हणजे वस्तुस्थितीतील एक अद्भुत गोष्टच होय. या संस्थेचे स्थापक कै० वा० महादेव चिमणाजी आपटे यांचा आयुष्यक्रम पहातां त्यांनी जुन्या पंथाचे वैदिक, शास्त्री, सन्यासी, वगैरेंकरिता व जुन्या संस्कृत ग्रंथांच्या प्रकाशनार्थ एक संस्था काढण्यांत आपल्या सर्व द्रव्याचा विनियोग करावा याबद्दल कोणासही आश्चर्यच वाटेल. भांड्यात जी वस्तू प्रथम ठेवावी तिचा वास त्याला लागतो असें जें म्हणतात तें पुष्कळ वेळा मोठ्या विचित्र रीतीने प्रत्ययास येतें; त्यांतीलच हे एक उदाहरण असावें. अण्णासाहेब प्रथम सुधारक म्हणून, विशेषतः पुनर्विवाहाचें पुरस्कर्ते, म्हणून समाजापुढें आले. त्यांचा पुढील आयुष्यक्रमही जुन्या पंथाला कोणत्याही प्रकारचा पोषक असा नव्हता. त्यांनी आपला द्रव्यनिधि वस्तुतः एखाद्या आधुनिक तऱ्हेनें चाललेल्या शिक्षणसंस्थेस किंवा एखाद्या सुधारणाप्रचारकसंस्थेस द्यावयास पाहिजे होता. पण तसें न करितां त्यांनीं जुन्या पद्धतीप्रमाणेंच तो वैदिक, शास्त्री, संन्यासी वगैरेंच्या सहाय्यार्थच वेंचला. याचें कारण, जुन्या संस्कारांचा त्यांच्या प्रथम वयांत त्यांच्या मनावर उमटलेला ठसाच असावा असें वाटतें. चतुर्थाश्रम घेण्याचा त्यांचा बेत पूर्वी-पासूनच ठरला होता. आनंदाश्रमाचा खर्च चालण्यास अवश्य असलेली रक्कम जमतांच चतुर्थाश्रम घेऊन आश्रमांत रहावयाचें असा त्यांचा संकल्प झाला होता. संस्थेला यदाकदाचित् अधिक पैशाची जरूरी पडली तर चतुर्थाश्रमांतही वकिली करण्याचें त्यांनीं ठरविलें होतें। खरोखरच ही त्यांची इच्छा मूर्तस्वरूपांत आली असती तर वस्तुसृष्टींत एका अद्भुताचा प्रत्यक्ष प्रयोग घडलेला लोकांना पहावयास सांपडला असता !

## आपटेघराण्याचा अभिमान.

या आश्रमाच्या दोन उपयुक्त शाखा म्हणजे विद्यार्थीगृह व ग्रंथप्रकाशन या होत. विद्यार्थीगृहांत कोंकणस्थांचीं गरीब व होतकरू मुलें विद्याभ्यासाकरितां ठेवून त्यांचें पालनपोषण करावें, असा माधवरावजीचा संकल्प होता. त्याचप्रमाणे अप्रकाशित पण चांगल्या नामांकित संस्कृत ग्रंथांचें या आश्रमाच्या विद्यमानें प्रकाशन व्हावें असाही त्यांचा हेतु होता. आश्रमांतील या दोन उपयुक्त शाखा हरिभाऊंनी त्याच्या इच्छेप्रमाणें त्याच्या पश्चात् पचवीस वर्षेंपर्यंत चालविल्या व हल्लींही त्या तशाच चालू आहेत. आपल्या आपटे घराण्यातील मुलें मूर्ख निपजूं नयेत, असाही माधवरावजीचा विद्यार्थीगृह काढण्यांत एक उद्देश होता. त्या उद्देशानुसार माधवरावजींच्या तिन्ही भावाचे मुलगे आनंदाश्रमांत विद्याभ्यासाकरिता राहून गेले. त्यातील कित्येकाचें थोडें थोडकें शिक्षणही झालें. पण अण्णासाहेबानी केलेल्या या सोयीचा फायदा घेऊन नावलौकिकास चढलेला असा अद्याप एकही मुलगा निघाला नाहीं ! हा विलक्षण योगायोगच म्हटला पाहिजे.

हरिभाऊंना आनंदाश्रमासारखी संस्था मिळाल्यामुळें त्याना बरेंचसें स्वास्थ्य आलें. त्यांच्या आयुष्यास निश्चितपणा येण्यास या संस्थेचें सहाय्य झालें. ग्रंथ-लेखनाच्या कामास स्वस्थपणाची व सुखसोयीची अनुकूलता लागते ती या आश्रमानें त्याना लाभून दिली. पण ही संस्था चालविणाराने जुन्या पद्धतीनेच राहिलें पाहिजे, असा निर्बंध असल्यामुळे हरिभाऊंना, स्वतःस संमत वाटणाऱ्या प्रगमनशील गोष्टी आचरणांत आणण्याचा मार्ग कायमचाच बंद झाला. जी मतें आपण प्रतिपादीत आलों त्याचें आचरण होण्याचे कामीं अशा रीतीनें आपण कायमचा बंधारा घालून घेतला ही गोष्ट हरिभाऊंच्या मनास अर्थातच जाचक झाली असली पाहिजे. पण वडीलधाऱ्या माणसाचे प्रेमपाश तोडून स्वमताभिमानास अनुरूप असें आचरण करण्यास प्रवृत्त होण्यासारखी धडाडी आणि निग्रह त्यांच्या अंगीं नसल्यामुळें या जाचाचा प्रतिकार त्यांना करितां आला नाहीं.

## कर्तव्य कीं श्रद्धा !

हरिभाऊंच्या सहवासानें आणि साहचर्यानें ज्या आश्रमाचें नांव अन्वर्थक झालें त्या आश्रमाची व्यवस्था पाहण्याचें काम हरिभाऊंनीं पंचवीस वर्षें केलें. येथील निरनिराळया प्रकारचे विधि, व्रतवैकल्यें, उत्सव, कथाकीर्तनें, वगैरे सर्वांची व्यवस्था हरिभाऊ अगदीं यथासांग रीतीनें करीत. या सर्व गोष्टी ते

अंगीकृत कर्तव्य म्हणून करीत किंवा अंतःकरणपूर्वक श्रद्धेनें करीत यासंबंधानें एकमत होणें अर्थातच शक्य नाही. तें कसेंही असलें तरी आपलें ज्यांनीं पितृवत् पालन केलें त्या आपल्या चुलत्यांच्या इच्छेप्रमाणें त्यांनीं ही संस्था पंचवीस वर्षें निर्वेध रीतीनें चालविली व ते त्यांच्या ऋणांतून मुक्त झाले. हें त्यांनीं कर्तव्य म्हणूनच केलें हे पुढें एका प्रकरणांत डॉ. पॉल ज्युसेन यांचा जो उतारा दिला आहे त्यावरून लक्षांत येईल.

## महादेव चिमणाजींचा दृष्टान्त.

आनंदाश्रमाचें काम सोडून यावें असे हरिभाऊंच्या मनांत वरचेवर विचार येत होते. पण तसे करणें हे काही सोपें काम नव्हतें. त्यांच्यावर ती एक मोठी जबाबदारी होती. या संस्थेच्यामुळें आपल्या सामाजिक मताचा सर्वस्वी कोंडमारा होतो असें त्यांना एकीकडून वाटे तर दुसरीकडून ज्यांनीं आपलें पुत्रवत् पालन केलें त्यांनी आपल्या सुप्रन केलेली कामगिरी अर्धवर कशी टाकून यावी, अशी त्यांच्या मनांत वरचेवर धडपड चाले. कित्येक वेळां संस्थेचें काम सोडून देणेंच श्रेयस्कर आहे, असाही त्याचा निश्चय झाल्यासारखा होई. अशाच एका प्रसंगीं " हें काम सोडूं नये " असा त्याना अण्णासाहेबांचा दृष्टान्त झाला. तेव्हांपासून या बाबतीत त्यानी आपल्या मनाची चलबिचल होऊं दिली नाही. हरिभाऊंचा स्वप्नावर व दृष्टान्तावर विश्वास होता. अशा गोष्टीवर विश्वास बसणें न बसणें हें सर्वस्वी त्याचा, जसा ज्याला अनुभव येईल त्यावर अवलंबून असतें. स्वप्न आणि दृष्टान्त हे पुष्कळ वेळां भावी स्थितीचे पूर्व ज्ञान करून देण्याचे कामी साहाय्यभूत होतात असा आपल्या आयुष्यक्रमात हरिभाऊंना अनुभव आला असला पाहिजे. त्यामुळेंच त्याचा अशा गोष्टीवर पुष्कळ वेळां विश्वास असल्याचें दिसून येत असे. पण लक्ष्यात कोण घेतो, मी, भयंकर दिव्य वगैरे त्याच्या कादंबऱ्यात पुढील स्थितीचें ज्ञान करून देणारीं स्वप्ने पडल्याचे जे कित्येक ठिकाणीं निर्देश आहेत तेहि हरिभाऊचा अशा गोष्टीवर विश्वास असल्याचेच द्योतक होत.

## ग्रंथप्रकाशन.

आनंदाश्रमांत जुन्या नव्या पंथाचे यती, संन्यासी, शास्त्री वगैरे अनेक प्रकारचे लोक येत. पण हरिभाऊंच्या प्रेमळ व मनमिळाऊ स्वभावामुळें सर्वांचें आदरातिथ्य यथास्थित होऊन कोणाचेंही असमाधान होण्यास जागा रहात नसे.

आनंदाश्रमांत तैलंगणातील विद्वान् शास्त्री पाहिने पुष्कळ वेळां येत, त्यांच्याशी हरिभाऊ संस्कृतांत बोलत. हरिभाऊंचें संस्कृत चांगले असे, त्याचा त्याना अशा वेळी चांगला उपयोग होत असे. विशेषतः त्यांच्या या गुणाचा उपयोग आश्रमाच्या ग्रंथप्रकाशनाच्या शाखेसंबंधांत उत्कृष्ट झाला. त्यांच्या पंचवीस वर्षांच्या अमदानींत ही शाखा चांगली रंगरूपाला आली. आनंदाश्रमाच्या विद्यमानें प्रकाशित झालेल्या ग्रंथापैकी " सर्वदर्शनसंग्रह " हा ग्रंथ हरिभाऊंनींच संपादिला होता. आणि त्यानी आपल्या आयुष्यक्रमांत जर कांहीं संपादन केलें असेल तर तें सर्वदर्शनसंग्रह हेंच होय. त्याच्या कादंबऱ्यांतही हाच संग्रह पाहून वाचकांचे मन चकित होऊन जातें।

## यति, संन्यासी यांच्या गमती.

आश्रमांत निरनिराळ्या ठिकाणचे यती, संन्यासी, उतरावयास येत. त्यांच्या एकेक गमतीदार गोष्टी हरिभाऊंस पहावयास सापडत. एकदा एक स्वामी दोन दिवस आश्रमांत जेवले व पुढें जेवावयास बाहेर जाऊं लागले. आपण जेवावयास बाहेर का जातां ? असा त्याना प्रश्न केला. तेव्हां त्याना सांगितलें की, तुमच्या घरीं गाय व्याली असल्यामुळे तुम्हाला सोयर आहे !

कांही स्वामी पैशास हात लावीत नसत. पैसा द्यावयाचा असला कीं तो वस्त्रांत बांधून दिलेला घेत असत. कोणी एक स्वामी तोंडांत बाण ठेवीत व तो पूजेच्या वेळेस काढून त्याची पूजा करीत व पुन्हां पहिल्या जागीं नेऊन ठेवीत ! एकदां एक स्वामी आले. त्यांनीं पानांतील पहिल्याच वाढीचा काला करून खाल्ला व पुन्हा कांहीं एक घेतलें नाहीं. तेव्हा हरिभाऊना फारच वाईट वाटलें. स्वामींची ही पद्धत आधीं माहीत असती तर त्यांना चांगले चांगले पदार्थ त्यानीं प्रथमच वाढविले असते. या स्वामींनी कांहीं पैसे द्यावेत, छाट्या द्याव्यात किंवा निदान कांहीं संस्कृत ग्रंथ तरी द्यावेत अशी हरिभाऊंची इच्छा होती. पण त्यांनीं यांपैकीं कशाचाही स्वीकार केला नाहीं. आनंदाश्रमांत येणाऱ्या संन्याशांमध्यें असे निरपेक्ष व निस्पृह गृहस्थ फारच थोडे येत. हे स्वामी जे एकदा गेले त्यानंतर त्यांचें पुन्हां कधींहि दर्शन घडलें नाहीं.

एक स्वामी आले. त्याचीं एकेक वस्तानें फारच कठीण होती. आंघोळ केल्यानंतर शूद्राचें तोंड पहावयाचें नाही, जेवण अंधारांत जेवावयाचें, व जेव-

तांना एकेक घांस लोकांनीं त्यांच्या हातांत दिला पाहिजे ! असे त्यांचें विचित्र नियम असत. आनंदाश्रमातून या स्वामींना एक दिवसांतच गाशा गुंडाळून निघून जावें लागलें.

एकदा एक पाहुणे आले ते दाणदाण पाय आपटीत मालकाचा शोध करूं लागले. त्याबरोबर हरिभाऊंनी पुढें होऊन त्यांची विचारपूस केली. तेव्हां ते गृहस्थ, आपल्याला काय पाहिजे, काय नाही याबद्दल हुकूम करण्याच्या आवाजानें गुरकावूं लागले. मनुष्यस्वभावाचें निरीक्षण करण्यांत पटाईत असलेल्या हरिभाऊंसही त्यांच्या या वृत्तीचें कारण समजेना. या मनुष्याचे डोकें वगैरे फिरलें असेल अशी समजूत होऊन हरिभाऊंनी त्याची सर्व व्यवस्था नीट रीतीनें ठेविली. शेवटीं ' आनंदाश्रम ' नावाची पुण्यात एक खानावळ आहे, त्या खाणावळींत आपण आहोंत असें हा गृहस्थ समजत असल्याचें हरिभाऊंच्या लक्षात आलें !

## माणसांची रहदारी.

आनंदाश्रमांत हरिभाऊंकडे सकाळपासून संध्याकाळपर्यंत खो दिल्यासारखी एकामागून एक माणसें येत. पण हरिभाऊंना माणसांचें वेड इतकें होतें की, स्वतांची कितीहि गैरसोय झाली तरी ते कोणास कधींहि दुखवीत नसत. जो भेटावयास येई त्याच्याशीं शांतपणानें बोलून ते त्याचा परामर्ष घेत. कोणाच्या अंतरींची कोणतीहि व्यथा असो, ती हरिभाऊंपाशीं निवेदन करण्याकरिता यावयाचें असा पुढें पुढें तर कित्येक लोकांचा अगदीं क्रमच ठरल्यासारखा असे. हरिभाऊ मात्र आपली व्यथा कोणापाशींहि कधीं सांगावयाचे नाहींत. प्रत्येकाच्या मागें त्याची स्वतःची भगभग आहेच. आपण आणखी त्यांत भर कशाला घाला, असें ते नेहमीं म्हणत. त्यांच्या वेळेवर मात्र कोणीहि स्वामित्व गाजवावें असा त्यांच्या आंगीं विलक्षण भिडस्तपणा होता.

## नाटपेड भानगडी.

हरिभाऊंच्या मागें हा नुसता माणसांच्या रहदारीचा ससेमिरा असे असें नसून इतरही अनेक नाटपेड भानगडी असत. पुण्यांत कोणतीहि संस्था निघो, हरिभाऊ पत्रांतील श्रीकाराप्रमाणें त्या संस्थेचे एक सभासद असावयाचेच; एखाद्या संस्थेचे सेक्रेटरी, दुसऱ्या संस्थेचे अध्यक्ष, तिसरीचे उपाध्यक्ष, चवथीचे

नियामक अशाप्रमाणें प्रमुख स्थानावर नेमून घेण्याची मनुष्यास एकदां संवय होत गेली म्हणजे त्या चक्रांत तो कायमचाच अडकला जातो. इतक्या संस्थांचें काम एकाच्या हातून होणें अर्थातच अशक्य असतें, यामुळें पुष्कळ संस्थांची पुरस्कर्ती व प्रमुख म्हणून जीं माणसें गणलीं जातात त्यांची प्रसिद्धी व हातून प्रत्यक्ष होणारें काम हें बहुधा व्यस्त प्रमाणांतच असतें. कोठल्याही संस्था घ्या, त्या सर्वांत शहरांतील प्रमुख व पुढें पुढें असणाऱ्या दहा पाच माणसांपैकी आलटून पालटून एक दोन किंवा तीन असे सभासद असावयाचेच. यापेक्षां एका माणसानें दोन तीन संस्थापेक्षां अधिक संस्थांचे सभासद व्हावयाचें नाहीं असा सभासद होणारानीं किंवा त्याना सभासद कर- णारानीं निर्बंध ठेविल्यास तो खरोखरच उभयपक्षीहि हितावह होईल. शेंकडों संस्थाशीं मनुष्यानें संबंध ठेवला तरी अखेर एक दोन संस्थांच फार तर त्यास आपल्या कर्तृत्वाचा ठसा उमठविणें शक्य असतें. हरिभाऊंचेच उदाहरण पाहिलें तर अनेक संस्थांशीं कोणत्याना कोणत्या स्वरूपांत त्याचा संबंध असला तरी त्यांच्या नावाचें साहचर्य ज्या संस्थेशीं जोडले जाईल अशी फक्त एकच संस्था निघेल. आणि ती नूतन मराठी विद्यालय हीच होय. अनेक संस्थांत धावाधांव करण्यापेक्षां एक दोन संस्थातच स्थिरतेनें व एकतानतेनें काम करणें परिणामीं अधिक श्रेयस्कर ठरतें. हें तत्त्व समाजांत प्रमुख गणलेल्या व्यक्तींनी लक्षांत ठेवल्यास त्यापासून सर्वस्वी हितच होईल.

---

# प्रकरण अकरावें.

## आणखी दोन संस्था.

### नूतन मराठी विद्यालय.

आनंदाश्रमाप्रमाणेंच हरिभाऊंचा सुमारें ३०-३५ वर्षे संबंध होता अशा दुसऱ्या एका संस्थेचा येथे निर्देश करणें अवश्य आहे. किंबहुना तो निर्देश करण्याचें चुकल्यास, हरिभाऊंनी आपल्या आयुष्यक्रमांत केलेला एक अत्यंत महत्त्वाचा कार्यभाग नमूद न केल्यासारखे होईल. ती संस्था म्हणजे नूतन मराठी विद्यालय ही होय. शास्त्रीबुवानी स्थापन केलेल्या न्यू इंग्लिश स्कूलमध्ये लाइफ मेंबर म्हणून काम करण्याची हरिभाऊंची फार इच्छा होती. पण ते पदवीधर नसल्यामुळें व पदवीधराशिवाय कोणासही लाइफ मेंबर घ्यावयाचें नाही, असा सोसायटीचा निर्बंध असल्यामुळें त्याचा ही इच्छा सफळ होणें शक्य झाले नाही. तरी पण स्वस्थ न बसतां त्यानी आपली ही मनीषा शेवटास नेण्याची दुसरीच एक संधि साधली. सन १८८३ साली शास्त्रीबुवाचें स्मारक म्हणून एक शाळा येथे सुरू करण्याचा बूट निघाला. या कार्यास ट्रेनिंग कॉलेजमधून पास झालेले २।३ गृहस्थ तयार झाले. गेल्या ता. १४ फेब्रुवारी रोजी परलोकवासी झालेले रा. कृष्णाजी बल्लाळ डोंगरे हे यापैकीच होत. या शाळेचा अव्वलपासून अखेरपर्यंत इतिहास माहीत असलेले शाळेतल्या शिक्षकांपैकीं, हे एकच गृहस्थ होते. यांना संस्था स्थापन करण्याच्यावेळीं हरिभाऊंच्याच सल्लामसलतीचा विशेष फायदा झाला. या संस्थेशीं हरिभाऊंचा, एक आस्थेवाईक प्रमुख कार्यकर्ते म्हणून, अव्याहत संबंध होता. हरिभाऊंचा उत्साह, कर्तृत्वशक्ति व शिक्षणलालसा ह्या तिन्ही गुणाचा जर कोठें विशेष उपयोग झाला असेल तर तो या संस्थेसंबंधांतच होय. डी. ई. सोसायटीनें त्यांना लाईफ मेंबर म्हणून घेतलें असतें तर त्याना फार तर प्रो. आपटे म्हणून प्रसिद्धी मिळवितां आली असती. पण या संस्थेशीं त्यांचा अगदीं आरंभापासून संबंध जडल्यामुळें त्यांना एक वेगळी संस्था निर्माण

करण्यांत प्रमुखपणा घेतां आला. अगदीं तात्यापंतोजी शाळेपासून पूर्ण कॉलेज-पर्यंत चढत गेल्याचें या संस्थेसारखें इलाख्यांतील शिक्षणाच्या इतिहासात दुसरें उदाहरण सांपडणार नाहीं. ही संस्था हरिभाऊंच्या वैचित्र्यमय आयुष्यांतील खरोखरच एक संस्मरणीय गोष्ट होय.

## संस्थेचा विकास.

ही संस्था प्रथम मोरोबादादांच्या वाड्यांत सुरू झाली. एक दोन वर्षांतच या शाळेस इंग्रजी तीन इयत्ताचे वर्ग जोडण्यांत आले. सन १८९० साली इंग्रजी ५ इयत्तांपर्यंत मजल गेली आणि १८९५ सालीं या शाळेचें हायस्कूल झालें. यानंतर वीस वर्षांनी कॉलेजचे पहिले दोन वर्ग निघाले व पुढे चार वर्षांत हें फर्स्ट ग्रेड कालेज झालें. नूतन मराठी शाळेच्या अंकुरातून न्यू पूना कॉलेजचा वृक्ष तयार झाला; त्याचें श्रेय या शाळेच्या स्वार्थत्यागी चालका-प्रमाणेंच हरिभाऊंनाही देणें जरूर आहे.

## शिक्षकाचें काम.

शाळेला इंग्रजी वर्ग जोडण्यात आले तेव्हापासूनच हरिभाऊ आठवड्यातून काही तास शाळेंत शिकवूं लागले. हा त्यांचा क्रम पुढे १०।१२ वर्षे चालूच होता. शिकविण्याबद्दल त्यांनीं वेतन वगैरे काहीं घेतलें नाही हे सांगावयास नकोच. हरिभाऊंच्या शिकवण्यावर विद्यार्थ्यांचें साहजीकच प्रेम असे. एक दोन वर्षे तर त्यानी सायन्स हा विषय सातव्या इयत्तेस शिकविला, तेव्हा तो विशेष मनोरंजक केल्याबद्दल त्यानी विद्यार्थ्यांकडून वहावा मिळविली. हरिभाऊंना इतर पुष्कळ व्याप असत, पण या संस्थेच्या कामास ते नेहमी अग्रस्थान देत. या संस्थेसंबंधानें पूर्ववयात आपण ठरविलेले मनोरथ आपल्या हयातीत सिद्धीला गेलेले पाहून त्यांना परमावधीचा आनंद होत असे।

## मुलांना उपदेश.

शाळेंतील मुलांकरितां दरसाल एक उपदेशात्मक व्याख्यान द्यावयाचें हा त्यांचा क्रम कमींत कमी २० वर्षे चालला होता. संस्थेच्या उत्कर्षाकरिता जे जे म्हणून करणें जरूर असे ते तें मोठ्या औत्सुक्यानें व तत्परतेनें ते करीत. कॉलेज निघाल्यानंतर त्याच्या लायब्ररीकरितां त्यांनीं आपला सुमारें पाच हजार रुपये किंमतीचा पुस्तकसंग्रह त्यास बक्षीस दिला. अशा रीतीनें शिक्षणसंस्था

व लेखनव्यवसाय या दोन्ही मार्गांनीं हरिभाऊंनी तरुण पिढीस उपकृत केले आहे.

## ऑनररी पदव्या.

हरिभाऊंना युनिव्हर्सिटीची पदवी संपादन करतां आली नाहीं, पण युनिव्हर्सिटीच्या परीक्षांना ते परीक्षक झाले. सीनेटच्या फेलोच्या जागीं त्याची योजना झाली. उच्च शिक्षणांतील परीक्षाना विद्यार्थी पाठविणारी एक संस्थाही त्यांच्या प्रमुखत्वानें अगदी अल्पारंभामधून विकास पावली. त्यांनी लिहिलेले कित्येक ग्रंथही उच्च परीक्षांच्या अभ्यासाकरितां नेमण्यांत आले. त्यांना याहून अधिक पदवी ती कोणती मिळावयाची राहिली होती ! अशा गृहस्थांना युनिव्हर्सिटीकडुन त्यांच्या गुणानुरूप ऑनररी पदव्या देणें किती अवश्य आहे हें हरिभाऊंच्या उदाहरणाधरून विशेष रीतीनें लक्षांत येतें. अशा पदव्या दिल्यानें त्या घेणाराचा मोठेपणा वाढतो अशांतला भाग नसून त्यांवरून युनिव्हर्सिटीस खरी गुणग्राहकता आहे हें मात्र सिद्ध होईल.

## पुणें शहर म्युनिसिपालिटी.

हरिभाऊंच्या आयुष्यक्रमाशीं संलग्न असलेली तिसरी संस्था म्हटली म्हणजे पुणें शहर म्युनिसिपालिटी ही होय. हरिभाऊ म्युनिसिपालिटीचे सुमारें २० वर्षे सभासद होते व तीन वर्षे अध्यक्ष होते. हरिभाऊंची शांतवृत्ति व मनमिळाऊ स्वभाव असल्यामुळे म्युनिसिपालिटींतही त्यांना कांही माणसांचा आत्मपरिवार करितां आला. ते म्युनिसिपालिटींत होते तोंपर्यंत त्यांची अशी एक स्वतंत्र संघटना होती आणि त्या संघटनेच्या सामर्थ्यावर त्यांना बरींच महत्त्वाचीं कामें करितां आलीं. कित्येक वर्षे तर हरिभाऊ म्हणजे पुण्याची म्युनिसिपालिटी अशीच स्थिति झाली होती.

## अबकारी कमिटी.

पुणें जिल्ह्याकरिता प्रथम अबकारी कमिटी नेमली तेव्हां ते म्युनिसिपालिटीतर्फे तीन सभासद असून लोकपक्षाची बाजू कमिटीपुढें मांडण्याचें काम त्यानीं अनेक वेळां चांगल्या तऱ्हेनें केलेलें आहे. त्या वेळी त्यांच्या खटपटीनें कांहीं गुत्ते बंद होणें, कांहींचें स्थलांतर होणें, गुत्ते उघडे राहण्याची वेळ कमी होणें अशा कित्येक श्रेयस्कर सुधारणाही झाल्या आहेत.

म्युनिसिपालिटीच्या स्कूल बोर्डाचे चेअरमन असतां त्यांनीं पुणें येथील अजबखान्यांत शिक्षण या विषयावर शिक्षकांपुढें व्याख्यानें दिलीं, तीं फारच महत्त्वाचीं व अध्यापनाचें काम करणारांना अत्यंत उपयुक्त अशीं होतीं.

म्युनिसिपालिटीसारख्या बारभाईचे संस्थेत एका व्यक्तीला आपल्या कामाचा विशेष ठसा उमटविणें अर्थात् कठीण असतें. तरी पण म्युनिसिपालिटीत विशेष कळकळीनें काम केल्याबद्दल ज्या गृहस्थांची प्रशंसा होईल त्यांत हरिभाऊंची गणना झाल्याशिवाय राहणार नाहीं.

## म्युनिसिपालिटींत शिरले नसते तर !

म्युनिसिपालिटीत हरिभाऊ शिरले नसते तर फार बरें झालें असतें, असें त्यांच्या कित्येक मित्रांचें म्हणणें आहे. म्युनिसिपालिटीसंबंधांत त्यांचा बराच वेळ वाया गेला ही गोष्ट खोटी नाही. आणि इतका वेळ त्यांना आपल्या लेखन-व्यवसायाला देता आला असता तर महाराष्ट्रमंदिराची शोभा अधिकच वाढली असती हेंही निर्विवाद आहे. प्रत्यक्ष हरिभाऊंनाही आपण म्युनिसिपालिटीच्या नगभगींत शिरलों हें फार वाईट केलें असें कित्येक वेळा वाटत होतें.

अमुक झालें असते म्हणजे तमुक घडले असतें, किंवा अमुक झालें नसत म्हणजे तमुक टळलें असतें हा काथ्याकूट केव्हाही निरर्थकच असतो आणि यातलाच हाही आहे. एक तासांत पांच पानें लिहिली म्हणजे वीस तासात शंभर पानें होतील असा लेखनव्यवसायासंबंधांत तंतोतत त्रैराशिकानें हिशेब करणें केव्हांही शहाणपणाचें होणार नाही. जमिनीला पांच रुपयांचें खत घातलें म्हणजे दहा रुपयाचें पीक येतें, येवढ्यावरून ५०० रुपयाचें खत घातलें म्हणजे १००० रुपयांचें पीक येईल असा अंदाज धरून जमिनीतून पकि काढणारा जसा पश्चात्तापात पडेल, त्याप्रमाणेच दर दिवसास लेखनाची एक दोन तास सरासरी पडल्यावर हरिभाऊंनी जर अठरा कादंबऱ्या केल्या तर सबंध दिवस त्यांना याच उद्योगाला मिळाला असता तर त्यांचे हातून बारा पट काम झालें असतें असें म्हणणें हेंही वेडेपणाचें होईल।

## झालें हें काम पुष्कळ झालें.

हरिभाऊंच्या हातून झालें हें काम कांहीं थोडें झालें नाहीं. सहा सामाजिक व सात ऐतिहासिक अशा एकंदर तेरा पूर्ण कादंबऱ्या त्यांनीं लिहिल्या व तीन सामाजिक व दोन ऐतिहासिक अशा ५ कादंबऱ्या अपूर्ण लिहिल्या. याशिवाय पांच सहा नाटकें, दहावीस उत्कृष्ट निबंध व शें दोनशें स्फुट गोष्टी इतकी ग्रंथ-रचना त्यांनीं केली. वस्तुतः एका माणसाचे हयातींत येवढी ग्रंथोत्पत्ति झाली

ती कांहीं कमी नाहीं. म्युनिसिपालिटीत गेल्यानंतरच्या चवदा वर्षांत हरि भाऊंनीं दहा कादंबऱ्या लिहिल्या. १९१३ नंतर मात्र त्यांचा व्यवसाय खुंटल्या सारखाच झाला. आणि त्याचें कारण त्यांच्या प्राणापेक्षांही प्रिय असलेल्या कन्येचा अत्यंत शोकजनक मृत्यु होय. हरिभाऊ आपल्या वयाच्या ५६ व्या वर्षी निवर्तले. तरी पण त्यांच्या आयुष्यांतील शेवटचीं ६ वर्षे ग्रंथोत्पत्तिसंबंधांत प्रायः व्यर्थच गेलीं. त्यांच्या हातून खरा लेखन-व्यवसाय १८९० पासून १९१३ पर्यंत म्हणजे तेवीस वर्षेंच झाला. यांत पहिल्या पंचविशींतला व्यवसाय अर्थातच धरलेला नाहीं. कारण मागील एका प्रकरणांत त्यासंबंधानें सविस्तर माहिती दिली आहे. या सर्व गोष्टींचा विचार करिता हरिभाऊंच्या हातून अधिक ग्रंथोत्पत्ति झाली नाहीं याबद्दल निष्कारण दुःख करीत न बसता पन्नास वर्षांच्या हयातींत कोणाही विख्यात ग्रंथकारास भूषणीभूत होईल इतकी ग्रंथरचना त्यांच्या हातून झाली याबद्दल आनंद मानणेंच अधिक सयुक्तिक होईल, असें वाटतें.

आनंदाश्रम, नूतन मराठी विद्यालय, व म्युनिसिपालिटी यांशिवायही त्याचा अनेक संस्थांशी थोडा फार संबंध असे. पुणें येथील सेंट जॉन अँब्यूलन्स कमिटीचे ते सभासद होते त्याचप्रमाणे फीमेल हायस्कूलच्या कौन्सिलचेंही ते सभासद होते. डेक्कन सभा, डिस्ट्रिक्ट कॉंग्रेस कमिटी, भाडारकर इन्स्टिटयूट वगैरे संस्थांशीही त्यांचा अत्यंत निकट संबंध होता. सात वर्षांपूर्वी दिल्ली येथें धर्मादाय देणग्या संबंधानें विचार करण्याकरिता जी परिषद् भरली होती तींत मुंबई इलाख्यातर्फे ते सभासद् होते. पंचवीस वर्षांपूर्वी प्लेगच्या कहरांत पुणे शहरी त्यांनीं केलेली कामगिरी सुप्रसिद्धच आहे. स. १९१८ मधील इन्फ्ल्युएंझा च्या साथींत इन्फ्ल्युएंझा हॉस्पिटल निघालें तें त्यांच्या प्रमुखत्वानेंच होय. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे पुण्यांत नांव घेण्यासारखी अशी संस्था किंवा चळवळ सांपडणें कठीण पडेल की तिच्याशी हरिभाऊंचा प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें संबंध नव्हता. पुण्यातच काय पण सबंध महाराष्ट्रांत असा बहुविध आयुष्यक्रम क्वचितच सापडेल.

---

# प्रकरण बारावें.

## आवडत्या कन्येचा वियोग.



### मुलांवरील प्रेम.

हरिभाऊंना लहान मुलांची फार आवड होती. त्यांचा दिवसांतील कांहीं काळ मुलांच्या संगतीत गेला नाहीं असें क्वचितच घडलें असेल. दिसण्यांत तरतरित आणि बाळसेदार असें कोणाचेंही मूल घेऊन खेळवावेंसे वाटतें. असें मूल मनुष्य साहजिकच उचलून घेतो. पण हरिभाऊंची मुलांच्या कामांत अशी आवडनिवड नसे. मूल मग ते कसलेंही असो, त्यांना प्रिय असावयाचें. अगदीं जरत्कारु झालेलें, अंगाला सुरकुत्या पडलेल्या, स्वतःच्या आयुष्यास जणूं काय कंटाळलेंच आहे असा आंबट चेहरा केलेलें, सदा किरकिर करणारें असें, 'पण लक्ष्यांत कोण घेतो?' मधील दुर्गीच्या मुलाप्रमाणेंही एखादें मूल असलें तरी हरिभाऊ त्याला प्रेमानें कडेवर घेत. त्यांचें बालवात्सल्य पाहून भोंवतालच्या माणसांना खरोखरच मोठें आश्चर्य वाटे ! हरिभाऊ कोणाच्या घरांत गेले कीं, आधीं त्यांची दृष्टि तेथील चिल्यापिल्याकडे किंवा बाळगोपाळांकडे जावयाची ! मुलांना त्यांच्या या प्रेमाची मनोमय साक्ष पटूनच की काय, जीं मुलें आपल्या आईबापांशिवाय किंवा सहवासातील माणसांशिवाय इतरांचें वारेंही लागूं द्यावयाचीं नाहीत तीं मुलें हरिभाऊंकडे आनंदानें जात. तशांतूनही एखादें मूल त्यांच्याकडे जाण्यास नाराज दिसलें की, त्यांचें मन खरोखरच खट्टू होत असे. मुलांच्या निष्कपट सहवासांत त्यांना जितका रम्यपणा वाटे तितका तो इतर बाबतींत क्वचितच वाटत असे.

हरिभाऊ ज्या ठिकाणीं जात त्या ठिकाणची मुलें ते येण्याची वाटच पहात बसलेली असावयाचीं. मुलांचें मनोगत, त्यांची भाषा, त्यांच्या हालचाली वगैरेंचें हरिभाऊ फारच कौतुकानें निरीक्षण करीत, म्हणूनच मुलेंही त्यांच्याशीं इतका लागटपणा करीत असावीं.

## हरिभाऊंचे बालस्नेही.

हरिभाऊंचा आवाज ऐकला की, घरांतील मुलें त्यांच्या भोंवती जमलींच म्हणून समजावें. मुलांची त्यांची एकदां गांठ पडली की, ते त्यांच्याशी संभाषण करण्यांत गर्क होऊन जावयाचे ! मुलांशी काय बोलत बसतां, असे जवळच्या कोणी माणसानीं विचारलें की, " मुलांशी लाडिवाळपणाने बोलण्यांत काय गम्मत आहे हें तुम्हांला काय माहिती ! " असें हरिभाऊ म्हणत. मुलांचे मनोधर्म, सभोंवारच्या सृष्टीसंबंधानें त्यांच्या कल्पना, पाहिलें तसें करावें आणि ऐकलें तसें बोलावें ही त्यांची वृत्ति, बहीणभावंडांचे एकमेकांवरील प्रेम, वडील माणसांच्या वागणुकीचा व बोलण्याचालण्याचा मुलांच्यावर होणारा परिणाम वगैरेचें त्यांनी आपल्या कादंबऱ्यांतून जे मनोहर वर्णन दिलें आहे त्याची सिद्धता, मुलांशी वात्सल्यपूर्वक सहवास करूनच, ते नेहमी करीत असावेत असें वाटतें. हरिभाऊंनी या आपल्या वृत्तीनें कित्येक बालस्नेही केले होते. फिरून येतांना वाटेत कोणी भेटलें तरी त्यास ते घरीही आणावयाचे व त्याच्याशी घटका दोन घटका बोलून, त्यास कांही फराळाचें देऊन परत पाठवावयाचें. एखादे वेळी लहर लागली कीं, एखाद्या मुलावर लहानशी कविता करून ती त्यालाच वाचावयाला द्यावयाचे व कविता वाचून तो हंसूं लागला की आपण स्वतःही त्याच्याकडे प्रसन्न मुद्रेनें पहात बसावयाचे ! मुलांना चित्रें किंवा पुस्तकें बक्षिस देण्याचीही त्यांची पद्धत असे. लहर लागली तर एखाद्या मुलाला " कायरे, आम्हांला जेवायला कधी बोलावणार ? " असाही प्रश्न करावयाचे आणि त्यानें बोलावले तर खरोखरच जेवून यावयाचें ! घरच्या मंडळींनी त्यांचें स्वागत केलें तर त्यांना म्हणावयाचें की आज आम्ही तुमचे पाहुणे नाही, आम्ही मुलाचे पाहुणे आहों ! पुष्कळ वेळा असा ते गमतीत काळ घालवावयचे. कोणाच्या येथे उतरायला गेले आणि तेथील मुलांना खाऊ द्यावयाचा असला तर हरिभाऊ सहसा रोख पैसे केव्हांही द्यावयाचे नाहींत. चित्रें, पुस्तकें, फळफळावळ किंवा असेंच कांही तरी जिन्नस विकत घेऊन द्यावयाचे. रोख पैसे दिले कीं, ते वडील माणसाच्या हातीं जाऊन खर्च होतात, व मुलें कोरडीं ती कोरडीच राहतात याकरितांच ते असा मार्ग स्वीकारीत.

## मुलींवर अधिक प्रेम.

मुलांच्यापेक्षां त्यांचें मुलींवर अधिक प्रेम असे. आपल्या स्नेह्यांच्या मुलींना ते कित्येक वेळां बरोबर हिंडावयासही घेऊन जात. एखादी हुषार मुलगी

दिसली कीं "ही मुलगी आम्हाला द्या" असें तिच्या आईबापांजवळ म्हणत. आपलीं पुस्तकें मुलींना वाचावयास देऊन त्यांतला सारांश त्यांना विचारीत. मुलीनें सारांश चांगला सांगितला म्हणजे त्यांना अतिशय कौतुक वाटे. या त्यांच्या प्रेमळपणामुळें त्यांच्या कित्येक मित्रकन्या त्यांच्याशीं फारच लडिवाळपणानें वागत आणि यापासून हरिभाऊंना जो आनंद होई तो दुसऱ्या कशानेंही होत नसे! ते सहज वाटेनें गेले तरी "काय हरिभाऊ कसें काय आहे?" असा कित्येक मुलें त्यांना प्रश्न करीत व हरिभाऊही त्यास स्मित करून उत्तर देत. सारांश, हरिभाऊ हे मुलांचे अत्यंत जिवलग स्नेही असत.

## माझ्या बहिणीची मुलगी आहे.

त्यांच्या या बालवात्सल्याच्या किती तरी गोष्टी सांगतां येतील. एकदां त्यांच्या येथें एक स्वयंपाकाची बाई होती. तिची पांच सात वर्षांची मुलगी हरिभाऊंच्या नेहमीं जवळ जवळ असे. जेवायलासुद्धां त्यांच्याजवळ बसे. संध्याकाळीं माडीवर मंडळी जमली कीं ही मुलगी हरिभाऊंच्या जवळ जाऊन बसावयाची. कोणी खालीं जा म्हटलें तरी ती कांहीं तेथून हालावयाची नाहीं! तेव्हां मंडळींपैकीं एका वृद्ध गृहस्थानीं हरिभाऊंना विचारलें, "ही आपल्या पहिल्या कुटुंबाची मुलगी वाटते!" तेव्हां हरिभाऊ म्हणाले, "कुटुंबाची नाहीं, ही आमच्या एका बहिणीची मुलगी आहे!" हरिभाऊंचें हे विश्वभगिनीत्व खरोखरच प्रशंसनीयच होतें. त्यांच्याकरितां बंधुप्रेमानें हळहळणाऱ्या अशा किती तरी भगिनी दाखवितां येतील!

## आपल्याला धार्जिणें नाहीं.

हरिभाऊंचें बालकप्रेम असें विलक्षण होतें तरी त्यांना स्वतःला पुष्कळ दिवस अपत्य नव्हतें. त्यांच्या प्रथम पत्नीस तीन मुलें झालीं. पण त्यांपैकीं एकही जगलें नाहीं. त्यांची पहिली बायको बाळंतपणांतच मेली, यामुळें आपल्याला मूल न होईल तरच बरें, कारण बायकांना बाळंतपणाचा हा मोठा धोका असतो, आणि त्यांतून आपल्याला तर हें मुळींच धार्जिणें नाहीं असें त्यांना वाटत असे. हरिभाऊ साधारणतः मोठे धीराचे असत. कोणताही प्रसंग आला तर ते साधारण डगमगावयाचे नाहींत. पण एखाद्या गोष्टीचा त्यांना एकदां धसका बसला की तो कायमचाच रहात असे. पहिल्या बायकोचा त्यांनी फोटो काढून मोठी तसबीर तयार करविली आणि ती थोडक्याच दिवसांनीं

वाटली. फोटो आपल्याला मानवत नाही असें जें तेव्हांपासून त्यांच्या मनानें एकदां घेतलें तें कांहीं अखेरपर्यंत सुटलें नाही. त्यानंतर फोटोला बसावयाचें म्हणजे त्यांच्या अगदीं जिवावर येई!

## मुलीचा जन्म.

हरिभाऊंचा द्वितीय विवाह झाल्यानंतर दहा वर्षांनी त्यांना मुलगी झाली. तेव्हांपासूनच त्याना काळजी वाटूं लागली. आपल्याला अपत्य लाभत नाही, त्यांत कांहीं तरी संकटें येतात असें त्याना एकसारखें वाटे. आणि मित्यापाठीं ब्रह्मराक्षस म्हणतात त्याप्रमाणें त्याना ही मुलगी झाली तोंच त्याच्या कुटुंबाची नजबेत बिघडली! इतकी कीं, ती विकोपाला जाऊन काही मलते सलतें होतें कीं काय, अशीही काळजी वाटूं लागली. सुदैवानें तसे कांही न होतां रमावहिनी त्यांतून निभावल्या. पण आईच्या प्रकृतीचा मुलीच्या प्रकृतीवर मात्र अनिष्ट परिणाम झाला!

## हा पाहिलात का पेशंट!

मुलीची पहिली दोन तीन वर्षें तर आजारांतच गेली. हरिभाऊंसारखा उपाय करणारा नसता तर ती मुलगी या आजारातच जावयाची. पण तिच्या दुखण्याशीं झगडण्याचाच तिच्या आईबापांनी निश्चय केल्यामुळें ती आणखी काही वर्षें जगली. मुलीला भगेंद्रासारखा रोग झालेला होता. त्यावर दोनदा ऑपरेशन केलें, तरी जखम भरून येईना. तेव्हां कर्नल बर्क—त्या वेळचे सिव्हिल सर्जन—यानीं सांगितलें की, ही मुलगी फार दिवस जगणार नाही. जगलीच तर लंगडी-लुळी होईल, व मेंदूवर परिणाम होऊन वेडी होईल! पण तिची जखम अखेर घरच्याच टाणाटोणा औषधाने बरी होऊन ती या दुखण्यांतून पार पडली. पुढे काहीं दिवसांनीं एका पार्टीचे वेळी हरिभाऊंची व कर्नल बर्क यांची गांठ पडली. मुलगी हरिभाऊंच्या बरोबरच होती. तिला दाखवून हरिभाऊ कर्नल बर्क यांना म्हणाले, "हा पाहिला का तुमचा पेशंट?" आपलीं सर्व भविष्ये खोटीं ठरविणारा हा पेशंट पाहून कर्नल बर्क अर्थातच आश्चर्यचकित झाले.

## एकदम चालूं लागली!

मुलगी दुखण्यांतून उठली हें पाहून तिच्या आईबापांना अर्थातच आनंद झाला. तिला संभाळण्याकरितां नागूबाई नांवाची एक बाई ठेवली होती. या बाईनें ताईची फारच चांगली सेवा केली. त्या बाईला हरिभाऊ सहज म्हणाले,

" नागूबाई, तुम्ही ताईला चालवायला शिकवा, म्हणजे तुम्हांला एक मोठें लुगडें देईन. " या वेळीं नागूबाई मुलीचा हात धरून हळूहळू चालत होती. हरिभाऊचे हे शब्द ऐकताच ती मुलीला म्हणाली, " चालूं लाग बाई लवकर, मला लुगडें मिळावयाचें आहे. " असें म्हणून नागूबाईनें तिचा हात एकदम सोडून दिला आणि ताई खरोखरच चालूं लागली ! आणि नागूबाईना लुगडें मिळालें ! पुढें आईबापांना शोकसागरांत लोटून जावयाचें होतें म्हणूनच की काय ताईने आपल्या अल्पवयातच चकित करून सोडण्यासारखे असे अनेक चमत्कार केले.

## मुलीचा सुस्वभाव.

ताई (शांताबाई) रूपानें सामान्यच होती. पण तिचे नाकडोळे मोठे तरतरीत होते. तिचा वर्ण काळा होता, पण अंतःकरण पांढरें शुभ्र होतें. ती मोठी मोकळ्या मनाची व जगन्मित्र असे. हरिभाऊंकडे कोणीही आलें तरी त्यांच्याशी इचें पांच मिनिटात जमावयाचें ! तिची तोंडाची टकळी एकसारखी चालू असे. कर्मयोगांत चंद्रशेखराची बहिण चंद्री इचा जो स्वभाव वर्णन केला आहे तो ताईला तंतोतंत लागू पडतो ! किंबहुना आपल्या मुलीचेंच चरित्र चंद्रीच्या मिषानें हरिभाऊंनीं लिहिलें असावे अशी तें वर्णन वाचून खात्री झाल्याशिवाय रहात नाही.

## लिहिण्यांत सव्यसाची !

ताई फार हुषार होती. तिच्यांत बापाची अस्थिरता असल्यामुळें प्रथम तिचें लिहिण्यावाचण्याकडे चित्त नसे. पण पुढे तिला लिहिण्यावाचण्याचा इतका नाद लागला कीं, इसापनीतीसारखें पुस्तक ती तासचे तास घडाघडा वाचीत बसे. ती अक्षर तर इतकें वळणदार काढूं लागली की, हरिभाऊंकडे येणाऱ्या जाणाऱ्या गृहस्थांचा तो कौतुकाचा विषय होऊन राहिला ! आणि त्यांतही मुलीची गंमत अशी होती की, ती उजव्या व डाव्या दोनही हातांनीं सारखेंच वळणदार अक्षर काढी !

## अंतःकरणाची सदयता.

ताई अंतःकरणानेंही फार दयाळू असे. पहारेवाल्यानें भिक्षेकऱ्यांस " कांहीं मिळत नाहीं" म्हटलें कीं, ही त्याला "घरांतून आणतें, उभा रहा, जाऊं नकोस." असें म्हणून खरोखरच भिक्षा घाली व " आई त्याला जेवायला नको का ग,

आपण भिक्षा वाढली नाही तर त्याला जेवायला कसें मिळेल ? " असें म्हणें. मुलें म्हणजे फोनोग्राफासारखी असतात असें चंद्रीला अनुलक्षून हरिभाऊंनी जें वर्णन केलें आहे तें ताईला बरोबर लागूं पडत होतें.

## देखत बोलण्याची सोय नाहीं.

मोठी माणसें घरांत अनेक गोष्टी बोलतात. शेजारी मुलें असली तरी त्याचें त्यांना कांही वाटत नाहीं. पण यांपैकीं कांही मुलें अशी हुषार व चाणाक्ष असतात की, मोठ्या माणसाच्या बोलण्यातील वेचक मजकूर लक्ष्यात ठेवून ती पुढें केव्हा तरी, अजाणत का होईना, अगदी विलक्षण परिस्थितींत बोलून दाखवितात ! कित्येक वेळा अशा प्रसंगीं आईबापांना या मुलाच्या देखत आपण बोललों कशाला, असें होऊन जातें. अशाच मुलांपैकीं ताई होती.

## अस्थिर वृत्ति.

मुलीची अस्थिरता मात्र हुबेहूब हरिभाऊंसारखी होती. ती एका जाग्यावर स्वस्थ म्हणून कधी बसावयाची नाही. पुस्तक घेऊन वाचीत असली तरी आता या जाग्यावर, तर क्षणाभरानें दुसरीकडे, अशा सारख्या खेपा घालीत असावयाची. तात्या बाहेर निघाले की, सर्व सोडून एकदम त्यांच्याच मागें लागायची. हरिभाऊ तिला बहुधा बरोबर बाहेर घेऊन जात. ती फार अचपळ असे. बाहेर नेली तर तिचा सारखा हात धरून ठेवावा लागे. हात सुटला कीं कोणीकडे जाईल याचा कांहीं भरंवसा नाही. मुंबईत ती अशी एकदा चुकलीही होती !

## ताई तूं कोठें आहेस ?

हरिभाऊंना आधी मुलाची फार आवड. त्यातही ताई एकुलती एक. अत्यंत बोलकी व चाणाक्ष. मग त्यांनी तिला जीव की प्राण करावें यात आश्चर्य तें काय ? ताई तूं कोठें आहेस ? असा हरिभाऊंनीं प्रश्न केला की मुलीनें हरिभाऊंच्या हृदयास हात लावून " येथे " म्हणून सांगावें ! ताई मागेल ती वस्तु तिला मिळावयाची. मागेल तें पुस्तक, मागेल ती खेळणी, लागतील तितके कपडे, सर्व वस्तूंची रेलचल उडून गेलेली ! दहा मुलांना पुरेल इतका संसार एकट्या ताईचा !

## बालकादिन.

ताई अमुक होईल, ताई तमुक होईल असे तिच्यासंबंधानें हरिभाऊंचे हजारों मनोरथ चालावयाचे. आईबापांना तिला कोठें ठेवूं आणि कोठें न ठेवूं

असें होऊन जात असे. शहरांतील आपले सर्व बालमित्र आपल्या येथें एकत्र जमवून त्यांचा ताईशीं स्नेह जमवून देण्याकरितां हरिभाऊंनी बालकदिन समारंभ केला. सर्व मुलामुलींचा भोजनसमारंभ चाललेला पाहून हरिभाऊंच्या डोळ्यांतून प्रेमाश्रु चालले होते ! पण हे प्रेमाश्रु अखेरचेच ठरले. यानंतर थोडक्याच दिवसांत ताई आपल्या आईबापांना टाकून परलोकीं गेली !

## मुलीनें हृद्रोग लावला !

या प्रसंगाने हरिभाऊंच्या मनाला फार मोठा धक्का बसला. त्यांची शरीर प्रकृति मूळची चांगली निकोप. त्यांचें शरीरही साधारण गुटगुटित. अंगांत कोट, डोक्याला एक लहानसा रुमाल, डोळ्याला चष्मा व अंगावर उपरणें नाही अशी ती त्याची साधारण मध्यम उंचीची मूर्ति अनेक वर्षे एकसारखी कायम होती. पन्नाशीचा सुमार आलेला, तरी हरिभाऊ साधारण तरुणच दिसत. पण या मुलीच्या मृत्यूनें, तिच्या हृद्रोगानें त्यांचें शरीर थोडक्याच दिवसात पार पोखरून निघालें ! त्यांच्या डोळ्यातील पाणी पार नाहीसें झालें ! अंबा, केळें, चहा, कढी वगैरे मुलीला आवडत्या अशा सर्व वस्तूंचा त्यांनी त्याग केला. पण वस्तुतः इहलोकाच्या कोणत्याच वस्तूनें त्यांना आनंद होईनासा झाला. मुलीमुळे जें जग त्यांना उपवनाप्रमाणें वाटत होते तेंच तिच्या देहावसानानंतर जीर्णारण्याप्रमाणे वाटूं लागलें ! फार काय, पण " या विश्वाला उत्पन्न करणारा जर कोणी असेल, तर तो सदय अंतःकरणाचा परमेश्वर नसून पक्का निर्दय व कठोर असा राक्षसच असला पाहिजे " असेही कन्यावियोगाच्या वेतागात त्यांच्या तोंडून उद्गार निघण्यास चुकले नाहींत ! अशा स्थितीत आपण अमुक कादंबऱ्या लिहूं आणि तमुक कथानकें संपवूं वगैरे त्यांच्या मनोरथाचे किल्ले पार ढासळून पडावे यांत आश्चर्य तें काय ! हरिभाऊ आपल्या मुलीच्या पश्चात् सहा वर्षे हयात होते, पण त्यांच्या मुलीबरोबरच त्यांच्या ग्रंथकर्तृत्वाची प्रायः समाप्ति झाली !

---

# प्रकरण तेरावें.

## मित्रपरिवार.

### कांहीं निवडक मित्र.

हरिभाऊचा स्वभाव प्रेमळ व विनोदी असल्यामुळें त्यांचा मित्रांचा परिवार फार मोठा होता. त्यांच्या स्नेह्याची यादी करावयाची म्हणजे एक लहानसें पुस्तकच होईल! थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे महाराष्ट्र, वऱ्हाड व मध्यप्रांत यांतील सुबुद्ध व प्रमुख लोकांत हरिभाऊंचा स्नेही किंवा परिचित नव्हता असा मनुष्य क्वचितच सांपडेल. तरी पण, त्यांच्या विशेष घरोब्याचे स्नेही म्हटले म्हणजे प्रो. ना. स. पानसे, प्रो. राजवाडे, प्रो. भानू, रा. रामचंद्र मोरेश्वर साने, श्री. काशिताई कानिटकर, प्रि वि. ग. आपटे, रा. ब. ग. कृ. साठे, रा. वासुदेवराव जोशी, रा. ब. अंजनगावकर, नगरचे रा. कृष्णराव वाबळे, रा. ना. म. समर्थ, ग्वाल्हेरचे रा. ब रावजी जनार्दन भिडे, डॉ. यशवंत गोविंद आपटे, रा. वासुदेव गोविंद आपटे, इंदूरचे रा. दामोदर विनायक कीर्तने, डॉ. तांबे, रावसाहेब वि. अ. पटवर्धन, रा. दि. ह. वाकनीस, रा. अ. ग. वांगीकर, रा. हरि सिताराम दीक्षित, रा. ब. म. के. कुमठेकर, रा. ब. विष्णु मोरेश्वर महाजनी, नागपूरचे रा. मोरोपंत दीक्षित, रा. वि. स. पटवर्धन, रा. ल. र. गोखले इत्यादि होत. हरिभाऊंच्या परलोकस्थ मित्रांत नमूद करण्यासारखे म्हटले म्हणजे महादेव दिनकर जोशी, रामकृष्ण भिकाजी कुलकर्णी, वामन विष्णु लेले, कृ. वि. सोहनी, प्रो. वासुदेवराव केळकर, नारायणराव फाटक, विनायक महादेव पंडित, हरि महादेव भडकमकर, विनायक नारायण आपटे, चिंतामण नारायण आपटे, वामनराव रानडे, गोविंदराव कानिटकर, शं. मो. रानडे, कृ. प. गाडगीळ, नारायण बापुजी कानिटकर, कृष्णाजी बल्लाळ डोंगरे इत्यादि होत. पुणें शहरांत म्युनिसिपालिटीशीं व इतर अनेक संस्थांशीं हरिभाऊंचा प्रमुखत्वानें संबंध आल्यामुळें वकील, व्यापारी, शेट सावकार, वगैरे सर्व वर्गांत त्यांचे मित्र असत आणि कोणचेंहि महत्वाचें काम आलें कीं हे मित्र हरिभाऊंच्या सल्ल्याचा फायदा

घेण्यास कधीहि चुकत नसत. कोणी कांहीं कामाकरितां आल्यास हरिभाऊहि त्याच्या उपयोगी पडण्यास सदैव तत्पर असत.

## सर्व वर्गांतील स्नेही.

हरिभाऊंच्या स्वभावांत अन्योन्यविरोधी गुणांची छटा दिसत होती, त्याप्रमाणेंच त्यांच्या मित्रमंडळींतही अनेक वर्णांच्या, वर्गांच्या व वयाच्या गृहस्थाचा भरणा असे. सामाजिक, राजकीय वगैरे बाबतींत कोणत्याही प्रकारची समानता नाही अशा गृहस्थांशींहि हरिभाऊंची निर्व्याज व अकृत्रिम मैत्री असे. याचें ठळक उदाहरण म्हटलें म्हणजे चित्रशाळेचे मालक रा. रा. वासुदेवराव जोशी यांचें होय. हरिभाऊ व वासुदेवराव हे सार्वजनिक बाबतींत अगदीं विरुद्ध असत, तरी उभयतांचा खाजगी प्रेमसंबंध ४० वर्षेपर्यंत अस्खलित रीतीनें चालू होता. हरिभाऊ आणि वासुकाका यांची गांठ पडली नाहीं, असा एखादा दिवस सांपडला तर क्वचितच सापडेल, इतकी त्यांची निकट मैत्री होती. हरिभाऊंनी आपली ' सूर्योदय ' ही कादंबरी त्यांना अर्पण केली होती. पण चित्रशाळेंतच ती छापली असल्यामुळें, अर्पणपत्रिकेवरील आपलें नांव काढून, "मतवैचित्र्यामुळे, किंबहुना मतविरोधानेंहि पसतीस वर्षांत ज्याच्या व माझ्या स्नेहांत अणुभर सुद्धां अंतर पडलें नाही अशा माझे मित्रास हें पुस्तक अर्पण केलें आहे" या आशयाचा मोघमच मजकूर वासुकाकांनी शिल्लक ठेविला !

## नागरिककर्तव्य.

१९१८ च्या मार्च महिन्यांत कै. टिळक व त्यांचे कित्येक सहकारी हे डेप्युटेशनवर विलायतेस जावयास निघाले. त्यावेळेस पुणें येथें खांडवाली मॅन्शनमध्यें उद्यानोपाहाराचा व पानसुपारीचा समारंभ झाला. वस्तुतः कै. टिळक व हरिभाऊ यांचें सामाजिक कार्य व राजकीय कार्य या दोन्ही बाबतींत भिन्न गोत्र होतें. तरीहि एका प्रमुख नागरिकाच्या सत्कारसमारंभाच्या वेळीं हजर राहणें हें नागरिक म्हणून आपलें कर्तव्य आहे,ही जाणीव बाळगूनच हरिभाऊ या समारंभास हजर राहिले. टिळकांचा प्रवास निर्विघ्न होऊन हातीं घेतलेल्या कार्मी त्यांना यश येवो, अशी इच्छा प्रदर्शित करतांना त्यावेळीं हरिभाऊ म्हणाले, "गुरुवर्य टिळक, आपण ज्या कार्याला जात आहां त्या कार्यांत आपणास पूर्ण यश मिळो, अशी सर्वांच्या वतीनें मी परमेश्वराची प्रार्थना करितों. आपल्याला पूर्ण यश मिळो, असें म्हणण्यांत नातवाच्या डोक्यावर छत्रचामरें पाहण्याचा वर

मागणाऱ्या अंध व वृद्ध ब्राह्मणाचेंच मीं अनुकरण केलें आहे. पूर्ण यश मिळो म्हणण्यांत आयुरारोग्य व सामर्थ्य ही आलीच; याबद्दल निराळी प्रार्थना नको."

## आयुष्यक्रमावर वजन.

वरील मित्रांच्या यादीपैकीं हरिभाऊंच्या आयुष्यावर ज्यांचा विशेष परिणाम झाला असे फारच थोडे होते. यांत कै. गोविंदराव कानिटकर व श्री. काशीताई कानिटकर या दंपत्याचा प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे. गोविंदराव फारच प्रेमळ गृहस्थ असत. वादविवादांत मोकळ्या मनानें बोलणारा व मोकळ्या मनानें बोलून घेणारा त्यांच्यासारखा दुसरा गृहस्थ क्वचितच सांपडेल. त्यांचा विद्याव्यासंग बऱ्यापैकीं असून लेखक म्हणूनही त्यांचा लौकिक होता. त्यांच्या पत्नी श्री. काशीताई यांनीही बहुधा स्वावलंबी प्रयत्नानें शिक्षण संपादन करून विदुषी स्त्रियांत स्थान मिळविलें. जुन्या नव्यांतील चांगल्या गोष्टींचें प्रमाणशीर संमिश्रण आपल्या वर्तनक्रमांत दाखवून समाजाच्या आदरास पात्र होणाऱ्या स्त्रियांत काशीताईंना प्रमुखस्थान दिलें पाहिजे. या दंपत्याचा आणि हरिभाऊंचा ३५ वर्षे अव्याहत स्नेह होता. हरिभाऊंनीं काशीताईंना आपल्या वडील बहिणीप्रमाणें मानिलें होतें, आणि काशीताईही हरिभाऊंना आपल्या सख्या बंधुप्रमाणें लेखीत.

कै. शंकर मोरो रानडे व रा. ब. वि. मो. महाजनी यांच्या योगानेंच हरिभाऊंना लेखनक्रियेची स्फूर्ति मिळाली याबद्दलचा उल्लेख पूर्वी आलाच आहे. कै. कृ. प. गाडगीळ हेही हरिभाऊंचे हायस्कूलमध्यें शिक्षक होते. त्यांच्या विद्याव्यासंगाबद्दल व विशेषतः उत्कृष्ट इंग्रजी लिहिण्याच्या हातोटीबद्दल हरिभाऊंना अतिशय आदर वाटे.

## कै. माधवराव जोशी.

हरिभाऊंच्या आयुष्याच्या पूर्वभागाशीं विशेष संलग्न असलेले असे दुसरे दोन गृहस्थ म्हटले म्हणजे कै. माधवराव जोशी व हरि महादेव पंडित हे होत. रा. माधवराव जोशी हे मोठे विचारी गृहस्थ असून त्यांनाही वाचनाचा नाद असे. ते इंग्रजी चांगलें लिहीत असत. सुधारकाच्या इंग्रजी कालमांत त्यांनीं लिहिलेले कित्येक लेख प्रसिद्ध झालेले आहेत. यांचा व हरिभाऊंचा अतिशय स्नेह असे. १८९७ सालीं माधवरावांना प्लेग झाला त्या वेळेस अगदीं अखेरपर्यंत हरिभाऊं- नीच त्यांची शुश्रूषा केली. माधवरावजींच्या निधनानंतर त्यांच्या पत्नी पार्वती-

बाई जोशी यांचाही हरिभाऊंनी उत्कृष्ट परामर्ष घेतला. पार्वतीबाईंना त्यांनीं आपली बहीण मानली होती व अखेरपर्यंत पार्वतीबाईंशी प्रेमळ भावाप्रमाणेंच त्यांचें वर्तन असे.

हरिभाऊंच्या हातून दुसऱ्याच्या उपयोगी पडल्याची वरीलप्रमाणें अनेक उदाहरणें सागतां येतील.

## कै. ह. म. पंडित.

कै. हरि महादेव पंडित हेही हरिभाऊंचे एक निकट स्नेही असत. हे हरिभाऊंपेक्षा दहा वर्षांनी मोठे होते. हरिभाऊ नागपुरला कॉंग्रेसकरितां जात, त्या निमित्तानें याची व त्याची ओळख झाली. पंडितही हरिभाऊंप्रमाणेंच विद्याव्यसनी असल्यामुळे पुढें त्यांचा चागला स्नेह जमला. सामाजिक बाबतीत या गृहस्थाशी त्यांची नेहमीं चर्चा होई. स्वतःचे विचार हरिभाऊंच्या ज्या कादंबरीत विशेष प्रतिबिंबित झालेले दिसतात ती ' मी ' कादंबरी त्यांनीं पंडितानाच अर्पण केली आहे.

## गोपाळराव गोखले

आता हरिभाऊंच्या जिवलग मित्रांपैकीं ज्याचा विशेष रीतीनें निर्देश केला पाहिजे असे गृहस्थ म्हटले म्हणजे कै. गोपाळराव गोखले हे होत. गोपाळरावाच्या बद्दल हरिभाऊंना फारच प्रेम व आदर वाटत असे. ते हरिभाऊंच्यापेक्षा दोन वर्षांनी लहान होते, तरी हरिभाऊ वडील भावाप्रमाणें त्याना मान देत. गोपाळराव हे स्वभावानें जरा तापट असत. त्याच्या मनात एखादी गोष्ट करावयाची नसली म्हणजे तेथें सहसा कोणाची भीड चालावयाची नाहीं, असा त्याचा स्वभाव असे. पण यास हरिभाऊ मात्र अपवाद असत. हरिभाऊंचें सांगणें गोपाळरावानी मोडले असें बहुधा कधीही होत नसे. गोपाळराव व हरिभाऊ हे एकमेकाचें विश्रामस्थान असत. गोपाळरावांचा पुण्यास मुक्काम असला म्हणजे हरिभाऊंची व त्यांची भेट झाली नाही असा दिवस क्वचितच जात असे. हरिभाऊंचा व त्यांचा स्नेह प्रथम १८८७मध्यें झाला. दोघाच्याहि उज्ज्वल आयुष्यक्रमाचा तो केवळ प्रारंभ होता. त्या वेळीं गोपाळरावांनीं हरिभाऊंना सहज प्रश्न केला की, "हरिभाऊ, पुढें आपल्या आयुष्यक्रमात तुम्हीं काय व्हावें असें तुम्हाला वाटतें ?" हरिभाऊंनी गोपाळरावांनाही तोच प्रश्न केला. "तुम्हीं आधीं सागा, तुम्ही आधी सांगा" अशात कांहीं वेळ गेल्यानंतर गोपाळराव म्हणाले,

" कॅबिनेट मिनिस्टर होऊन आपल्या देशाची कामगिरी करावी अशी माझी आकांक्षा आहे. " हरिभाऊंना गोपाळरावांचा हा निश्चय ऐकून फारच आश्चर्य वाटलें. पण गोपाळरावांच्या मृत्यूनंतर त्यांनीं वरील प्रसंगाचा निर्देश केला त्यावेळीं " गोपाळरावानीं खरोखरच स्वतःस कॅबिनेट मिनिस्टरचा दर्जा प्राप्त करून घेतला" असे त्यांच्या तोंडून कौतुकानें उद्गार निघाले. गोपाळरावांनीं वरीलप्रमाणें आपली इच्छा सांगितल्यानंतर हरिभाऊंनीही " समाजास सन्मार्गदर्शक असा विख्यात कादंबरीकार व्हावें अशीच माझी इच्छा आहे " असें सांगितलें दोघेही केवळ इच्छा करून राहिले नाहीत, तर दोघांनीही आपल्या बुद्धिमत्तेचा व आपणांस आलेल्या संधींचा योग्य उपयोग करून घेऊन तरुणपणींच ठरलेलें आपापलें ध्येय कसे हस्तगत करून घेतले हें कोणास सांगावयास नकोच

## कादंबऱ्या अधिक काळ जिवंत राहतील.

हरिभाऊ १९०९ सालीं मुंबई कायदे कौन्सिलच्या निवडणुकीकरिता उभे राहिले होते. ते निवडून येतील असें अगदीं अखेरपर्यंत वाटत होते. पण अगदी आयत्या वेळीं कांही विशिष्ट कारणामुळे परिस्थितींत एकदम पालट झाला व हरिभाऊ निवडून आले नाहींत. कौन्सिलकरिता ते उभे राहिले ते गोपाळरावांच्या आग्रहामुळेंच होत. हरिभाऊ निवडून आले नाहींत, यामुळें गोपाळरावांना अर्थातच फार वाईट वाटलें व त्यांनीं हरिभाऊंना मित्र या नात्यानें समाधानाचें एक पत्र लिहिलें. त्यांत " तुम्ही निवडून आलां नाहीं ही गोष्ट वाईट झाली. पण ती तुम्हास मनास लावून घेण्याचें कांहीं कारण नाहीं. आमच्या कौन्सिलमधील कामापेक्षांही तुमच्या कादंबऱ्या अधिक काळ जिवंत राहतील. " इत्यादि आशयाचा मजकूर होता. हरिभाऊंच्या कादंबऱ्यासंबंधानें गोपाळरावसारख्यांनाही किती आदर वाटे हें यावरून दिसून येतें.

गोपाळरावांच्या देहावसानापूर्वी दोन तीन दिवसच हरिभाऊ त्यांच्याशी बोलत बसले असतां गोपाळरावांनीं हरिभाऊंस विचारलें. "तुम्हांला आजपर्यंत कोणाच्या मृत्यूनें विशेष दुःख झालें ? " तेव्हां, हरिभाऊ म्हणाले, "माझ्या मुलीच्या मरणानें. " गोपाळराव म्हणाले, " एखाद्या स्नेह्याचें नांव सांगा " हरिभाऊंनीं अर्थातच माधवराव जोशांचे नांव घेतलें. गोपाळरावांच्या या प्रश्नाचा रोख हरिभाऊंनीं आधींच ओळखला होता. आपला मृत्यु

दररोज जवळजवळ येत आहे ही गोपाळरावांना पूर्ण जाणीव होती. आणि आपल्या मरणानें हरिभाऊंना अतिशय दुःख होईल हा विचार येऊनच त्यांनीं वरील प्रश्न केला होता. यानंतर तीनच दिवसांनी हरिभाऊवर तो दुःखद प्रसंग आला !

## ता. १९ फेब्रुवारी !

ता. १९ फेब्रुवारी १९१५ रोजी रात्री आठ वाजता गोपाळरावाची तब्येत अधिक बिघडली असा निरोप कळताच हरिभाऊ व मी असे टांग्यांत सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीत गेलों. त्या वेळेस गोपाळराव अत्यवस्थ होते. तरी पण ते चागले शुद्धीत होते. हरिभाऊंना पाहताच त्याना समाधान झाले. अंथरुणावरून मला आरामखुर्चीवर बसवा, असें गोपाळरावानीं सांगितल्यावरून दोन तीन माणसांनी त्याना धरून खुर्चीवर बसविलें. त्यानंतर पाचच मिनिटात त्यांचे प्राणोत्क्रमण झालें! शेवटीं वर बोट करून व मान हालवून "हरिभाऊ जाता आतां" असें म्हणून गोपाळरावांनी त्याना नमस्कार केला व डोळे मिटले. तो प्रसंग फारच हृदयद्रावक होता. आणि जेव्हा जेव्हा त्याची आठवण होई तेव्हां तेव्हां हरिभाऊंचे हृदय दुःखानें भरून येत असे.

हरिभाऊंची मुलगीही त्यापूर्वी दोनच वर्षे ता. १९ फेब्रुवारी रोजींच निवर्तली. अर्थात् त्या दिवशी त्यांना एक प्रकारची अस्वस्थता येत असे. तेव्हा हा दिवस म्हणजे त्याना दोन प्रिय माणसाच्या वियोगाचा दिवस असे. मुंबईस ते जलोदरानें आजारी पडले तेव्हां ता. १९ फेब्रुवारी या दिवशीं गोपाळरावांची चवथी निधनतिथि पडली. हरिभाऊंना सबंध रात्रभर झोप आली नाहीं. याच दिवशी आपली दोन प्रिय माणसे आपणास सोडून गेलीं, आपणही याच दिवशी इहलोक सोडून जातो की काय, असे त्याना एकसारखें वाटत होतें. त्यानंतर हरिभाऊंचा इहलोकींचा लागाबांधा बाराच दिवस राहिला होता ! यानंतर सातच दिवसानीं हरिभाऊ लिमये याच्या आकस्मिक मृत्यूची बातमी ऐकून त्याना पराकाष्ठेचें दुःख झाले.

## ओपनिंग सेरिमनी मी करीन.

हरिभाऊ लिमये यांच्या मृत्युपूर्वी दोन तीनच महिने प्रेतें नेण्याच्या पद्धतीसंबंधांत कांहीं सुधारणा होणें जरूर आहे, अशाबद्दल मंडळींत बोलणें निघालें. प्रेतें नेण्याकरितां एखादी सुंदर गाडी करावी, अशी हरिभाऊंनीं सूचना केली.

ती, हरिभाऊ लिमये यानाही पसंत पडली. यावर हरिभाऊ आपटे, हरिभाऊ लिमये यांना म्हणाले, "हरिभाऊ, तुम्ही भिऊं नका. मी तुमच्यापेक्षा वडील आहें. या गाडीचा ओपनिंग सेरिमनी मीच करीन." हें त्यांचें बोलणें झाल्यावर दोघेही हरिभाऊ चार महिन्यांच्या आनच पाच दिवसांच्या अंतरानें परलोकवासी झाले !

## युरोपियन मित्र.

युरोपियन लोकातही हरिभाऊंची मित्रमंडळी बरीच असत. सर जेम्स डुबोले, सर क्लाड हिल, नामदार कारमायकेल, मि. माउंटफर्ड, ना. कीटिंग, ना. किंकेड, मि. रॉबर्टसन्, मि. स्विफ्ट वगैरे अनेक गृहस्थांशीं त्याचा चागला परिचय असे. ना. किंकेड आणि ना. कीटिंग याच्याशी तर त्यांचा विशेष स्नेह असे.

एकदां कीटिंग यांचा जुन्नरास मुक्काम असताना त्याच्या निमंत्रणावरून हरिभाऊ त्यांचे ८ दिवसपर्यंत पाहुणे होते. हरिभाऊ हे शाकाहारी व जेवणाखाण्यांत जुन्या पद्धतीचे आहेत, ही गोष्ट मि. कीटिंग याना माहीत असल्यामुळें त्यानी हरिभाऊंकरिता तशी मुद्दाम तजवीज ठेविली होती.

हरिभाऊ मोठे विद्याव्यासंगी व बहुश्रुत असत, यामुळेंच त्याच्याशी परिचय करून घेण्याची युरोपियन लोक इच्छा बाळगीत. हरिभाऊंचा जमीनजुमला नव्हता, सावसावकारी नव्हती, किंवा सरकारातून त्याना कांही इनाम जहागीर मिळवावयाची नव्हती. अर्थात ते होऊन कधी कोणाच्या भेटीस गेले नाहीत. युरोपियन गृहस्थांनीं भेटीची इच्छा केली तरच ते त्याच्याकडे जात. एरव्ही जात नसत. तरी हरिभाऊंच्या शेवटच्या दहा बारा वर्षांत त्यांच्याशी परिचय करून घेतला नाहीं असा कलेक्टर्स, कमिशनर्स व कौन्सिलर्स याच्यामध्यें क्वचितच गृहस्थ सांपडेल, अशी स्थिति आली होती. लॉर्ड विलिंग्डन हेही त्याना मोठ्या आदरानें व प्रेमाने वागवीत.

## साहेब शुद्धीवर आले.

युरोपियन अधिकाऱ्यांमध्यें एखाद्या तिरमारखांशी गांठ पडली तर हरिभाऊ त्याची तेथल्या तेथेच संभावना करण्यास कमी करीत नसत. एकदां एका युरोपियन अम्मलदाराने त्यांना चिठ्ठी पाठवून आपल्या भेटीला बोलाविलें होतें. पण साहेबांची काय लहर फिरली कोणास ठाऊक, हरिभाऊंनी आपल्या नांवाचें कार्ड पाठविलें तेव्हां, 'आतां मला वेळ नाही,' असा साहेबांनीं आंतून निरोप

पाठविला. 'चिठ्ठीनें भेटावयास बोलावून भेटण्यास वेळ नाही असें सांगणे शिष्टाचारास धरून नाही' ही गोष्ट हरिभाऊंनीं साहेबांच्या निदर्शनास आणली, तेव्हा साहेब बाहेर आले व "आम्हांला काम अतिशय असतें,फुरसत मुळीच नसते,अशा फुशारकीच्या गोष्टी सांगूं लागले."हरिभाऊंनीं साहेबांच्या तोंडून हे शब्द ऐकताच तावडतोब उत्तर केलें की,"आम्ही रिकामे लोक आहोंत,अशीच आपली समजूत असेल तर ती साफ चुकीची आहे मला आपल्यापेक्षाहि अधिक कामें आहेत. आपली चिट्ठी आली म्हणूनच मी आपल्या भेटीस आलो. पुन्हां मात्र आपल्या चिठ्ठीचा मान ठेवण्याचें मला कारण उरले नाही हें चांगलेंच झालें." या उत्तराने साहेब ठिकाणावर आले व त्यानी झाल्या प्रकाराबद्दल हरिभाऊची माफी मागितली.

युरोपियन लोकांशीं सार्वजनिक बाबींसंबंधीं बोलण्याचा प्रसंग आला तर आपले मत स्पष्टपणें सांगण्यास ते केव्हाही कचरत नसत. कै. टिळक हे मंडालेहून सुटून आले, त्यावेळेस त्याच्या घराशेजारी पोलीसपहारा ठेवण्यांत येऊन त्याच्या भेटीला जाणाऱ्यावर टेहळणी ठेवली जात असे. या वेळी हरिभाऊ त्यांना भेटावयास गेले होते. त्याचें नाव पोलीसकडून वरती कळविण्यात आले ही गोष्ट त्याना समजल्याबरोबर ते कै टिळक याना आणखीही दोन वेळा भेटावयास गेले. यानंतर "सरकारी पेन्शनर व सरकारातून पदव्या मिळालेले लोक यानी कोणत्याही रीतीनें टिळकाशी संबंध ठेवूं नये, तसा ते ठेवतील तर सरकारकडून त्याचे योग्य रीतीनें पारिपत्य होईल" असें ता. ६ जुलै १९१४ रोजी शिक्षणखात्याच्या डायरेक्टराच्या सहीनें एक खाजगी सर्क्युलर निघाले. याच सुमारास हरिभाऊंचें एका कौन्सिलरशी भाषण झालें. त्यात या सर्क्युलरचा निर्देश करून त्यानी त्या युरोपियन अम्मलदाराला स्पष्ट सांगितलें की "तुमचे हें सर्क्युलर अत्यंत हास्यास्पद व अन्यायाचे आहे. मला सरकारनें केसर-ई हिंदचा चाद दिला म्हणून मी आपलें व्यक्तिविषयक स्वातंत्र्य आणि माझ्या हालचाली या सरकारच्या केव्हाही स्वाधीन करणार नाहीं ! माझ्या स्वातंत्र्याची चादी उडत असेल तर मी तो चाद परत करीन व इतरही पदवीधरांना तसें करावयास सागेन."

हरिभाऊंच्या या बोलण्याचा त्या युरोपियन अधिकाऱ्यावर काय परिणाम झाला हें सागता येत नाही. पण पुढें या सर्क्युलरची अम्मलबजावणी मात्र झाली नाही.

टिळकाच्या दारासमोरील पोलीसाचा पहारा उठविण्यासंबंधांत त्या वेळीं ज्यानी विशेष खटपट केली त्यांत हरिभाऊ प्रमुख होते हेंही लक्षात ठेवण्यासारखें आहे. राजकीय मतभेदामुळें, नागरिक कर्तव्यास आपण पराङ्मुख होतां कामा नये असें हरिभाऊंचे मत होतें. आणि ते त्याप्रमाणें कसे वागत याचा वरील हकीकत हा उत्कृष्ट पुरावा होय.

---

# प्रकरण चवदावें.

## राजकीय, सामाजिक व धार्मिक मतें.

:०:

### रा. सा. रानड्यांचे अनुयायी.

हरिभाऊंनी वेळोवेळी जी व्याख्यानें दिली, जे लेख लिहिले व इतर ज्या चळवळी केल्या, त्यांवरून त्याची राजकीय, सामाजिक व धार्मिक मतें काय होती याचें सविस्तर विवेचन करण्याचें कारण नाही. पुण्यांतील दोन पक्षांना तीव्र स्वरूप गेल्या चवदा वर्षांतच आलें असलें तरी हे पक्ष रावसाहेब रानडे यांच्या वेळेपासूनच अस्तित्वात असून त्याचें पहिलें दृश्य स्वरूप म्हणजे डेक्कन सभेची स्थापना हें होय. त्यापूर्वीहि १८९१ मध्यें संमतिवयाच्या बिलाच्या वेळी आणि १८९५ सालीं पुणें येथें राष्ट्रीय सभा भरली त्यावेळीं या पक्षभेदाची मजल बरीच पुढें गेलेली दिसून आली. रावसाहेब रानडे यांचे त्यावेळेपासून जे एकनिष्ठ अनुयायी आहेत त्यांपैकीच हरिभाऊ हे प्रमुख होते. गेल्या पंचवीस तीस वर्षांत रावसाहेब रानडे यानी घालून दिलेल्या मार्गानें ज्या अनेक चळवळी चालू आहेत त्यांशी हरिभाऊंचा निकट संबंध असे. टिळकांना उद्यानोपाहार व पानसुपारी झाल्याचा पूर्वी निर्देश केला आहे त्यावेळी भाषण करताना, हरिभाऊंनी आपल्या मताचें दिग्दर्शन थोडक्यात पुढे दिल्याप्रमाणे केलें होतें. त्यावेळी ते म्हणाले "न्यू इंग्लिश स्कूल व फर्ग्युसन कॉलेज या संस्था उघडल्या त्या दिवशी ज्यांनी आपली नावें त्या संस्थांच्या पटांत नोंदविली त्या विद्यार्थ्यांपैकींच मी एक होतों; परंतु शिक्षणाची इतिश्री झाल्यानंतर व्यवहारविचाराला सुरवात झाल्यावर मी कै० रानडे यांच्या शाळेंत शिरलों. व तेथें कै० गोखले यांच्या स्नेहाची जोड मिळाल्याकारणानें माझी मतें त्याच शिकवणीत बनलीं गेलीं व अद्यापिहि तीं तशीच आहेत." स्वराज्य चालविण्यास हिंदी लोक पात्र असून स्वराज्य-दानाविरुद्ध जे कित्येकांकडून आक्षेप घेण्यांत येतात ते कसे निरर्थक आहेत हें त्यांनी रा. रा. ल. ब. भोपटकर याच्या "स्वराज्याची मीमांसा" या पुस्तकास लिहिलेल्या छोट्या प्रस्तावनेंत मार्मिक व स्पष्ट रीतीनें दर्शविलें आहे. "करभार

देणारांच्या हातीच कारभार पाहिजे " हेंच सूत्र त्यांनीं त्या ठिकाणीं आपल्या ओजस्वी लेखणीनें विशद करून सांगितलें आहे. हरिभाऊंच्या राजकीय विचाराची अगदी अलीकडील स्पष्टोक्ति याच प्रस्तावनेंत पहावयास सांपडते.

## रानड्यांचे अनुयायी.

हरिभाऊ हे डेक्कन सभेचे कित्येक वर्षे सेक्रेटरी होते. डिस्ट्रिक्ट कॉंग्रेस कमिटीचेही ते एक प्रमुख सभासद होते. पुण्यास १९१५ साली पंधरावी प्रांतिक परिषद् भरली त्या वेळेस स्वागत कमिटीच्या चेअरमनच्या जागीं त्यांची योजना झाली होती. राष्ट्रीय सभेचे ते कट्टे भक्त होते. राष्ट्रीय सभेच्या निम्मेहून अधिक अधिवेशनांना ते हजर राहिले होते. कॉंग्रेसला स्त्रियांनीं हजर रहावें याबद्दल दुसऱ्या कॉंग्रेसच्या वेळीच त्यांनी स्त्रियांना उद्देशून एक विनंतिपत्र काढलें होतें. ज्ञान मिळण्याची सर्व साधनें स्त्रियांना उपलब्ध असावीत याबद्दल त्यांना आपल्या आयुष्यक्रमाच्या आरंभापासूनच कशी मनापासून कळकळ वाटत होती, हें यावरून दिसून येईल. रानडे-पक्षाचें प्रथमपासूनच निदर्शन करणाऱ्या ज्ञानप्रकाश पत्राशीं संपादक या नात्यानें सातआठ वर्षे त्यांचा संबंध होता. पूर्वी ज्ञानप्रकाश आंग्लो-मराठी असतांना इंग्रजी बाजूचें संपादकत्व हरिभाऊंकडेच कित्येक दिवस होतें. ज्ञानप्रकाश दैनिक करण्यास ज्यांची आस्था विशेष कारण झाली, त्यांतच हरिभाऊंचा प्रामुख्यानें उल्लेख करणें भाग आहे. आरंभीं दैनिक ज्ञानप्रकाशाचे संपादकत्वही त्यांच्याकडेच होतें.

## मतानें प्रगमनशील.

हरिभाऊंच्या सामाजिक कादंबऱ्यांचा प्रतिपाद्य विषय पाहिला म्हणजे त्यांचीं सामाजिक मतें कोणत्या प्रकारची होतीं हें वेगळें सांगावयास नकोच. समाजसुधारणेचे ते निस्सीम चहाते होते. संमतिवयाच्या कायद्यापासून तों पटेलबिलाच्या काळापर्यंत ज्या ज्या सामाजिक चळवळी झाल्या त्यांना हरिभाऊंची अंतःकरणपूर्वक अनुकूलता होती. १९१९ च्या जानेवारींत म्हणजे हरिभाऊंच्या मृत्यूपूर्वी दोनच महिने, त्यांचे इंदूर येथें पटेलबिलावर सर्वस्वी अनुकूल असें भाषण झालें होतें. आनंदाश्रमासारख्या जुन्या पंथाच्या संस्थेचें चालकत्व त्यांच्याकडे अगदीं तरुण वयांत आल्यामुळें त्यांना कार्यसुधारक होतां आलें नाहीं. शिवाय त्यांच्यासारख्या मनमिळाऊ व स्वमताभिमानापेक्षांही वडील

माणसांच्या मनाला न दुखविणें हें अधिक महत्त्वाचें कर्तव्य समजणाऱ्या माणसा- चा आयुष्यक्रम गेला यापेक्षां वेगळा गेला असता तरच आश्चर्य होतें. मनानें ते अत्यंत प्रगमनशील होते, तरी पुराणमताभिमानाची त्यांच्यावर अगदीं अखेर पर्यंत छाप होती त्यांचा पेहेराव व आचरण यांतही जुन्या पंथाचीच झाक स्पष्ट दिसून येत असे, त्याचेंही हेंच कारण असावें.

## दृष्टिकोण बदलण्याचें कार्य.

कर्ते सुधारक म्हणून त्यांना केव्हाहि लौकिक संपादितां न आला तरी समाजसुधारणेस ज्या शक्ति साहाय्यभूत झाल्या त्यांत त्यांच्या कादंबऱ्यांस बरेंच वरचें स्थान येईल. कारण समाजाचा दृष्टिकोण बदलून तो सुधारणाभि- मुख करण्याचें कार्य त्यांच्या कादंबऱ्यांनी जसें केले तसें गेल्या चाळीस वर्षांत दुसऱ्या कोणीही केले नाहीं. सुधारणेसंबंधानें इतर जे जे प्रयत्न झाले त्यांत हरिभाऊंसारखा टिकाऊ प्रयत्न दुसरा कोणाचाही झाला नसेल. स्वतां ते कर्तृत्ववान् सुधारक नसले तरी तसे सुधारक निर्माण करण्याइतकी प्रतिभा व लेखनशक्ति त्यांना लाभली होती. तिचा त्यांनीं उत्कृष्ट उपयोग करून समाज- सुधारणेचें जे बीज समाजात मोठ्या शिताफीने रुजविलें, त्यास अंकुर येऊन त्याचा मोठा वृक्ष झाल्याशिवाय केव्हांही रहाणार नाहीं. आजचीच तरुण पिढी घेतली तर ज्या मनोधारणेनें हरिभाऊंनीं आपल्या कादंबऱ्या लिहिल्या तीच मनोधारणा स्वीकारून सामाजिक सुधारणेस ही पिढी अंतःकरणपूर्वक मान्यता दर्शवित असल्याचे दिसून येतें.

## ही पद्धति पथ्यावरच पडली.

हरिभाऊ पुनर्विवाहित असते, त्यांच्या डोक्यावर केंस असते, नेकटाय्, कॉलर, बूट, पाटलोण, वगैरे युरोपिअन् पेहेराव त्यांच्या आंगावर असता तर त्यांचे ग्रंथ त्यांच्या समकालीन तरुण पिढीस इतके प्रिय झाले असते किंवा नाहीं याची शंकाच आहे. जुन्या समाजांत बाळबोध गणलेलें असें जें वळण त्यांच्यांत दिसून येत असे त्यामुळें समाजास ते आप्तस्वकीय असल्याप्रमाणेंच वाटत. सामाजिक बाबतींत त्यांच्या कादंबऱ्यांना आज जें आप्तवाक्याप्रमाणें महत्त्व आलें आहे तें, अशी स्थिति नसती तर, कदाचित् आलेंही नसतें. अर्थात् ज्या पद्धतीनें त्यांनीं आयुष्यक्रम घालविला ती पद्धत कार्यनिर्वाहाच्या दृष्टीनें एक प्रकारें श्रेयस्करच ठरली.

## विरुद्ध मतांची धडपड.

धार्मिक बाबतीत हरिभाऊंची खरोखर काय स्थिति होती हें निश्चित सांगणें त्यांच्या अगदीं निकटवर्ती मित्रांसही कठीण पडेल. ते आनंदाश्रमांतील हवकव्य, विधि वगैरे यथासांग करीत, देवदर्शनहीं घेत, सोमवार व शनिप्रदोष अशा-सारखे उपवासही करीत! त्यांना अपचनाची व्यथा असल्यामुळें आठवड्यांतून एक दिवस उपवास करण्याबद्दल डॉक्टरांनीं सांगितलें होतें. त्या दिवशी सोमवार असल्यामुळें तेव्हांपासून पुढे दर सोमवारी ते उपवास करीत असत. त्यांच्या सोमवारच्या उपासाची मीमांसा अशा तऱ्हेने लावितां आली तरी त्यांनी शनि-प्रदोष मात्र आपल्या वडिलांच्या सांगण्यावरूनच धरिला होता. त्याचप्रमाणें घरांत कांही सत्यनारायणासारखे कोणाचे नवस फेडावयाचे असले तर तेही ते फेडीत असत. नेहमी बोलण्यांत चालण्यांत मात्र, ते नास्तिक नसले तरी अज्ञेयवादी असले पाहिजेत, असें त्यांच्याशीं संभाषण करणारांना वाटे. मूळची त्यांची परंपरागत आस्तिक्य बुद्धि व मिलच्या वाचनानें मनावर झालेला संस्कार यांच्यामध्यें चालूं असलेली धडपड त्यांच्यामध्यें शेवटपर्यंत टिकली असें दिसतें.

### एक उदाहरण

विद्यार्थिदशेंत असतांना ते पंचहौद मिशनमध्यें फादर रेव्हिंग्टन यांच्याकडे फ्रेंच व जर्मन शिकावयास जात. एके दिवशी फादर रेव्हिंग्टन हे कांहीं कामांत गुंतले होते. तेव्हां हरिभाऊ बाहेरच एका मिशनरीशीं बोलत बसले. त्यांचें बोलणें अर्थातच धर्मासंबंधानें निघालें. मिशनरी गृहस्थानें हिंदु धर्मावर तोशेरा झाडण्यास सुरवात केली. हरिभाऊंनी यावेळेस नास्तिक पक्षाची बाजू घेतल्या-मुळें मिशनऱ्यांचें अर्थातच गाडें खुंटलें. पण दुसऱ्या दिवशीं याचा चमत्कारिक परिणाम झाला. आपल्याकडे शिकावयास येतो हा गृहस्थ नास्तिक आहे असें या मिशनऱ्यानें फादर रेव्हिंग्टन यांना सांगितलें. त्याबरोबर हरिभाऊंना तेथें शिकावयास जाण्याची बंदी होणार असा सुमार दिसूं लागला. तेव्हां हरिभाऊ फादर रेव्हिंग्टन यांना म्हणाले, "मी नास्तिक बाजू घेतली ती केवळ मिशनरी गृहस्थाला अडविण्याकरितांच घेतली. त्यानें हिंदु धर्माला शिव्या द्यावयाच्या आणि मी ख्रिस्ती धर्माची विटंबना करावयाची, असा प्रकार चालूं राहिला असता तर प्रकरण भलत्या थरावर गेलें असतें. हा परिणाम टाळण्याकरितांच मीं ही शक्कल काढली." या खुलाशानें हरिभाऊंना अर्थातच फादर रेव्हिंग्टन यांच्या

सान्निध्यांत पूर्ववत् प्रवेश मिळू लागला. हरिभाऊंनी ही वेळ अशा रीतीनें मारून नेली तरी हा प्रसंग, मिलच्या वाचनानें त्यांच्या मनावर जो परिणाम केला, त्याचाच द्योतक होता असें म्हणावयास हरकत नाही.

" धर्म हा एक विकार आहे, विचार नाहीं, तो श्रद्धामूल आहे.........परमेश्वर मुळींच नाही. यदाकदाचित् असला तरी तो आता सृष्टीशी संबद्ध नाहीं, त्यानें कोणाची प्रार्थना ऐकणें संभवनीय नाही. आपल्याला जे नीतियुक्त म्हणून वाटेल ते करीत रहावें. लोक हाच परमेश्वर. त्याच्या हितासाठी झटणें हीच परमेश्वरी सेवा ...... ज्याचे आपल्याला ज्ञान नाही, ज्याने कधी आपलें अस्तित्व जगाच्या अनुभवास आणून दिले नाही, असा एखादा सर्वव्यापी पुरुष कल्पावयाचा, आणि त्याच्यावर भार टाकून आपले व्यवहार चालवावयाचे म्हणजेच दौर्बल्य".

चंद्रशेखराची ही जी स्थिति हरिभाऊंनी आपल्या कर्मयोगांत वर्णन केली आहे तीच त्यांच्या तरुण वयात त्यांची स्वतांची असली पाहिजे हे उघड आहे. फरक इतकाच की, चंद्रशेखराच्या शिक्षणात धर्मविषयक शिक्षणाचा भाग अगदी मुद्दा आला नव्हता. त्याने आपल्या वडिलांपासून जे काय ग्रहण केलें होते ते जुन्या धर्मविषयक आचाराच्या कुचेष्टेचच होते. हरिभाऊंना बालवयात वडिलांपासूनच जुन्या पंथाचे संस्कार झाले होते त्यामुळें चंद्रशेखराप्रमाणें त्यांच्या मनांत विचार येत असले तरी ते काय-चे मूळ धरून रहाणें शक्य नव्हतें. या विचारांनी त्यांची आस्तिक्य बुद्धि हेलकावे खात असली तरी बालवयांत घडलेल्या संस्कारांचे पाश तुटून जाण्याइतके या विचारांचे प्राबल्य त्यांच्या वर बसलें नसावे असें साधारणतः म्हणण्यास हरकत नाहीं. यापूर्वी शिष्यजनविलापांत त्यांनीं शास्त्रीबुवांच्या आगच्या अनेक गुणांबद्दल प्रशंसा केली त्यांत त्यांच्या आस्तिक्यबुद्धीचाहा त्यांनी अंतर्भाव केला आहे. 'संत सखुबाई' व 'सती पिंगला' या त्यांच्या नाटकांवरूनही त्यांची आस्तिक्य बुद्धिच निदर्शनास येते. एकीकडे मिल, स्पेन्सरसारखे हरिभाऊ बोलत, तर दुसरीकडे कुळधर्म-कुळाचारांत आस्तिक्य बुद्धीनें पडत असलेले दिसून येत. तेव्हां हें कोडें उकलावें कसे हा मोठाच प्रश्न आहे त्यांच्या आयुष्यांत घडलेला एक प्रसंग खालीं दिला आहे, त्यावरून या प्रश्नास कांहीसें समर्पक उत्तर मिळेल असें वाटतें.

सन १८९३ साली विख्यात जर्मन पंडित डॉ. पॉल डायसन (कील युनिव्हर्सिटीमधील प्रोफेसर) हे हिंदुस्थानांत आले होते, तेव्हां त्यांचा पुणें येथें-ही एक दोन दिवस मुक्काम होता. हरिभाऊंनी या साहेबांच्या सहवासांत राहून त्यांना येथील सर्व प्रसिद्ध स्थळें दाखविलीं. त्यावेळीं या उभयतांमध्यें धर्मसंबंधाच्याही गोष्टी निघाल्या. या जर्मन प्रोफेसरांनी आपल्या हिंदुस्थानांतील आठवणी म्हणून एक पुस्तक त्याचवेळी प्रसिद्ध केले. त्यांत हरिभाऊंशी झालेल्या संभाषणावरून त्यांच्या धर्ममतांबद्दल आपल्या मनावर कोणता ठसा उमटला, याचें वर्णन डॉ. पॉल डायसन यांनीं खालीलप्रमाणें दिलें आहे:—

"Apte, a highly cultured and learned man, professed of course no religion but the Vedanta, but like Telang in Bombay, declared he was obliged to adhere to the worship of the gods on account of his family. All the images of the gods he looked upon as incarnations of the Atman, but he always took care not to confuse a mind that had not been able to rise to the idealism of this stand-point. I had the conviction here that those who think in India take the free standpoint in matters of religious doctrine as the thinkers of Europe, but out of consideration for their families still adhere to the worship of the gods, in the same way that we still hold fast to the ceremonies of a Church marriage, baptism and burial, though free from all superstitious ideas."

विचारास जें पटेल तेंच ग्राह्य मानणारा व धर्माचार व धर्मविधि यांवर विश्वास नसलेला असा यूरोप खंडांत जो सुधारकांचा संप्रदाय निघालेला आहे त्यांतही, केवळ कुटुंबांतील माणसांच्या समजुतीकरितां प्रार्थनामंदिरांत जाऊन डोळे मिटणारे व विवाहविधि, बाप्तिस्मा, अंत्यविधि वगैरेंस चिकटून रहाणारे पुष्कळ सांपडतात. त्याप्रमाणेंच हिंदुस्थानांतील सुधारक पंथाचें वर्तन आहे, ही गोष्ट डॉ. पॉल यांच्या निदर्शनास आली व तीच त्यांनीं वरील उताऱ्यात व्यक्त केली आहे. माझा धर्म वेदान्ताचा आहे, पण कुटुंबांतील माणसांकरितां मला देवदेवतापूजन करावें

लागते असेच आपल्याजवळ हरिभाऊंनीं सांगितल्याचें डॉ. पॉल वरील उताऱ्यांत म्हणतात. यावरून हरिभाऊंचीं धर्ममतें कशा प्रकारचीं असली पाहिजेत याचें साधारण अनुमान काढता येण्यासारखें आहे. थोडक्यांत सांगावयाचे म्हणजे आज प्रायः घरोघरच्या माणसांची धर्माबद्दल जी विचार प्रवृत्ति आहे तीच हरिभाऊंची होती. हरिभाऊंसारख्या विशिष्ट परिस्थितींतील माणसाना विचार आणि आचार यांत मेळ राखणें कसें कठिण पडतें याचीही कल्पना स्वानुभवानें पुष्कळाना येण्यासारखी आहे. " I have purchased family peace at the cost of my reputation. " हे कै. का. त्रिं. तेलंग यांचे उद्गार त्यांच्याच परिस्थितींत असलेल्या हरिभाऊंसारख्यांनाही ततोतंत लागू पडण्यासारखे आहेत.

जुन्या-नव्याच्या झगड्यांत धडाडीने पुढें जाण्याची धमक ज्याना दाखवितां आली नाही त्यांना लौकिकाची हानि पत्करूनही कुटुंबांत समाधान नांदवितां आलें असतें तर एका दृष्टीनें त्याचे अभिनंदन करतां आलें असतें. पण वस्तुस्थिति पुष्कळ ठिकाणीं याहून भिन्न होती. सामाजिक सुधारणेसंबंधात ज्यांनीं तेलंगांप्रमाणें वर्तन ठेवलें त्याना लौकिकाची हानि पदरांत घेऊनही घरच्या माणसांचा वाईटपणा टाळता आला नाही ! हा परिणाम पाहिला म्हणजे त्यांचें वर्तन कोणत्याही दृष्टीनें अभिनंदनीय न ठरतां अनुकंपनीयच ठरतें. हरिभाऊंच्या काळांत अशीं उदाहरणें कांही थोडीथोडकीं होतीं असें नाही. फार काय पण प्रगतीचें आगर म्हणून प्रसिद्धि पावलेल्या युरोपखंडांतही अशा उदाहरणाची रेलचेल कशी दिसते हे वरील उताऱ्यावरून लक्ष्यांत येतें.

# प्रकरण पंधरावें.

## आयुष्याची अखेर !

### प्रकृति थकत चालली.

हरिभाऊंच्या उज्ज्वल आयुष्यक्रमाचा प्रारंभ कशा रीतीनें झाला, त्यांच्या पुढील मोठेपणाची चिन्हें त्यांच्या बालवयांतच कशी दिसूं लागली, ते आपल्या प्रेमळ स्वभावानें महाराष्ट्राला कसे प्रिय झाले, इतर सार्वजनिक उपयुक्ततेचे अनेक व्यवसाय करून त्यांना उत्कृष्ट ग्रंथ कसे निर्माण करता आले, त्यांचा विद्याव्यासंग वयोमानाप्रमाणे वृद्धिंगतच कसा होत गेला, आपल्या ग्रंथात समाजाच्या दुष्ट चालीरीतीवर त्यांनी आघात केला असताही समाजाचें त्याच्यावरील प्रेम अबाधित कसें राहिलें वगैरे बाबीचें आतापर्यंत थोडक्यात निदर्शन केलें. आवडत्या शांताबाईच्या मृत्यूने हरिभाऊंच्या सर्व आशा, सर्व हेतु, सर्व मनोरथ धरणीकंपाचा धक्का बसल्याप्रमाणें कसे एकदम ढांसळून पडले याचेंही वर्णन पूर्वी येऊन गेलेंच आहे. मुलींच्या मृत्यूनंतर हरिभाऊंचें इहलोकचें वास्तव्य केवळ शरीरमात्रेंकरून होते. त्यांचें मन, त्यांचा मेंदु, त्यांची प्रतिभा वगैरे सर्व मुलीच्या मृत्यूबरोबर लुप्तप्राय होऊन गेली ! कोणत्याही गोष्टीला काय, मर्यादा असावी लागते. प्रेम झालें तरी तेंही मर्यादेंतच पाहिजे. पण जगास शहाणे करण्याऱ्या हरिभाऊंनाही आपल्या मुलीबद्दलचें प्रेम आवाक्यांत ठेवतां आले नाहीं ! प्रेमपाशाचा प्रभाव असा बळत्तर आहे! "ताई तूं कोठें आहेस?" असा हरिभाऊंनीं प्रश्न केल्याबरोबर, मुलगी, त्यांच्या हृदयावर हात ठेवून "येथें" असें उत्तर द्यावयाची. आणि मुलीच्या मृत्यूनंतर अखेर तेंच खरें ठरलें ! त्यांचें हृदय तेव्हांपासून खरोखरच शून्यवत् झालें आणि त्यांची मूळची सशक्त व निकोप प्रकृति हळू हळू ढासळूं लागली. अमुक करीन, तमुक करीन अशी ते तोंडानें इच्छा मात्र व्यक्त करीत, पण अंगांत उत्साह न राहिल्यामुळें त्यांच्या हातून उद्योग होईनासा झाला व मुलीच्या मरणानंतरच्या सहा वर्षांत पूर्ण अशा दोनच कादंबऱ्या त्यांच्या हातून झाल्या !

## हृदयविकार.

तीस वर्षांपूर्वी म्हणजे सन १८८८ मध्यें ते मुंबईस असता ; त्याना इन्फ्लुएंझा झाला त्या वेळेपासूनच त्यांना हृदयाचा विकार जडला होता. केव्हां केव्हा तर त्याच्या हृदयाची जागा कढत होऊन हृदय इतक्या वेगानें हलूं लागे कीं, वर हात ठेवला असताही ही स्थिति लक्षात येई. मुलीच्या धसक्यानें तर त्यांचा हा रोग विशेषच बळावल्यासारखा झाला. आणि आज काय ताप आला, उद्या अपचनाचा विकार झाला, परवा छातींत बाध बसला अशा अनेक उपाधींनी त्याचा पाठपुरावा चालविला. जे हरिभाऊ पन्नाशी उलटेतोंपर्यंत अगदीं तरुण माणसाप्रमाणे दिसत, त्याच हरिभाऊंवर जरेची छाया झपाट्यानें पसरूं लागली.

## आगंतुक भगभग.

त्याच काळांत आणखी एका अनाहूत कार्याची निष्कारण भगभग त्यांच्या-मागें लागली. बंगालमध्यें एका रेल्वेच्या फाट्याची परवानगी मिळवून त्या-प्रीत्यर्थ विवक्षित भांडवलाचे शेअर, त्यांवर कांहीं कमिशन घेऊन, जम-वावयाचे अशी एक योजना एका गृहस्थानें हरिभाऊंकडे आणली. हरिभाऊंनी मोठमोठ्या लोकांस चिठ्ठ्या चपाट्या देऊन त्याजकडून शेअर घेण्याबद्दल आपलें वजन खर्चावयाचें व या गृहस्थांनी अंगमेहनत करून योजनेची पूर्वतयारी होण्यास लागेल तो खर्च करावयाचा, असें ठरलें. पण या कामात दोन मुख्य अडचणी होत्या, त्या हरिभाऊंच्या लक्ष्यांत आल्या नाहींत. पहिली अडचण स्वतः-च्या फायद्याकरितां लोकांकडे तोंड वेंगाडण्याची हरिभाऊंस संवय नव्हती व तसें त्याचें शीलही नव्हतें. हाच धंदा त्यांना करावयाचा असता तर त्यांनीं आपल्या कादंबऱ्या राजेरजवाड्यांना अर्पण करून अमूप द्रव्याची प्राप्ति करून घेतली असती. या कामास ते स्वभावतःच नालायक होते, ही गोष्ट या बाबतींत पदोपदीं दृष्टोत्पत्तीस आली. एखाद्या श्रीमान् माणसाकडे किंवा संस्थानिकाकडे त्यांनी रेल्वेसाठी जावें आणि तेथें फक्त रेल्वेचीच गोष्ट न काढतां श्रीमंतांचा निरोप घ्यावा असे कित्येक प्रसंग घडले ! हातून काम तर होईना आणि शिरावर जबाबदारी तर घेतलेली असा त्यांचा दोहीकडून कोंडमारा झाला. या बाबतींत दुसरी अडचण अशी होती कीं, याच सुमारास सरकारनें वॉरलोनचे शेंकडा पांच सहा टक्यांचे वॉरबाँड काढले. अशा स्थितीत तितक्याच टक्यांचे रेल्वेचे शेअर कोण

घेतो !' मिळून चोहोंकडूनही प्रतिकूल स्थिति असता हरिभाऊंना या कामात पडण्याची बुद्धि झाली, आणि त्यांच्या मागें हा दुसरा एक नसता हृद्रोग लागला !

ज्या कामांत आपण पडूं नये त्यांत पडलों, ते साधत नाहीं तर सोडून द्यावें हेंही त्यांच्यानें होईना. आणि अखेर पाच चार वर्षे याच व्यग्रतेंत त्यांना निष्कारण घालवावीं लागलीं. आधीच हृद्रोगानें पोखरलेलें त्यांचे शरीर या काळजीमुळें जास्तीच निःशक्त झालें. सतरा कामांची धांवाधांव याबरोबर चालूच होती. त्यांत इन्फ्लुएंझा हास्पिटल काढण्याची दगदग तर त्यांना फारच जाणवली आणि सन १९१८ च्या आक्टोबरमध्यें त्यांच्या एका डोळ्याची पापणी खालीं पडून डोळ्याच्या पक्षघातासारखा त्यांना विकार झाला. यांतून बरे झाल्याबरोबर डिसेंबरच्या सुरुवातीसच वरील रेल्वेचे शेअर जमविण्याकरितां ते कलकत्याकडे फिरावयास गेले. तेथून परत येताना ते इंदुरास उतरले व त्या ठिकाणीं जलोदराची भावना झाल्याचें त्यांना डॉक्टरनी सांगितलें. शेवटीं हा रेल्वेचा व्यापच त्याना पुरून उरणार असा योगायोग होता व तोच अखेर खरा झाला !

## आशा जागच्या जागीं राहिल्या !

रेल्वेचे शेअर जमविण्याकरितां त्यांनीं ही जी सफर केली ती यशस्वी होण्याची स्पष्ट चिन्हें दिसत होतीं. विशेषतः, इंदुरास असतां हें काम पूर्ण झाल्यासारखेंच होतें. आणि जलोदरानें मार्गांत अवचित गांठून त्यांना मृत्यूच्या स्वाधीन केलें नसतें तर हेंही घेतलेलें काम यशस्वी झालेलें पहाण्याचा योग त्यांना खास आला असता. हरिभाऊंनीं प्रचंड लेखनव्यवसाय केला.पण हिणकस वाङ्मयाची झपाट्यानें उत्पत्ति करणाऱ्या कित्येक माणसांनीं जें द्रव्य संपादलें तितकेंहि द्रव्य हरिभाऊंना आपल्या अविनाशी वाङ्मयानें जोडता आलें नाहीं. याचें कारण अर्थातच त्यांचा अनियमितपणा होय. अमुक पुस्तक समाप्त होऊन प्रसिद्ध होते केव्हां अशी वाचकांनी प्रतीक्षा करीत बसावें आणि हरिभाऊंनीं शेवटची एकदोन प्रकरणें लिहिण्यास प्रसंगीं वर्षांनुवर्षें लावल्यामुळें त्याच्या त्या प्रतीक्षेचा हिरमोड व्हावा असें होत असे. रेल्वेचें काम जुळून आल्यास वार्धक्यांत पैशाची ददात मिटून आपल्याला निश्चितपणें आपला व्यवसाय चालवितां येईल अशीही त्याची या कामांत पडण्याची एक दृष्टि असावी. ती सफल होण्याचाही सुमार दिसूं

लागला होता. पण वर सांगितल्यामुळें एका असाध्य रोगानें त्यांच्यावर अचानक झाप टाकल्यामुळें त्यांच्या सर्व आशांची इमारत एकदम कोसळून पडली !

या स्थितीतच ते औषधोपचाराकरिता मुंबईस आले. त्या वेळी मतदान-कमिटीचें साक्षी घेण्याचे काम तेथें चालले होते. हरिभाऊंच्या हातापायास सूज आली असता व त्याची प्रकृति अगदी क्षीण झाली असतांही ते या कमिटीपुढें साक्षीकरिता गेले होते. पहिल्या दिवशीची अपूर्ण राहिलेली साक्ष पूर्ण करण्या-करिता दुसऱ्या दिवशीही ते कमिटीपुढें जाणार होते. पण डॉक्टरनीं प्रतिबंध केल्यामुळे त्यांचा निरुपाय झाला. जलोदरासारख्या असाध्य रोगाच्या तावडीत आपण सांपडलों आहोंत ही जाणीव असताही त्यानी याप्रमाणें आपल्या कर्तव्यात चूक न होऊं देण्याची खबरदारी घ्यावी हें पाहून त्यांच्याबद्दल कोणा-सही कौतुक वाटल्यावांचून रहाणार नाही. डॉ० नानासाहेब देशमुख, डॉ० भाजेकर, डॉ० भडकमकर प्रभृति मुंबईच्या नामांकित डॉक्टरानी त्याची प्रकृति पाहिली व त्याना बरे करण्याकरिता सर्वांनी आपली कसोशी केली. पण जेथें रोगच असाध्य तेथें मानवी प्रयत्नाची काय मात्रा चालणार ?

## स्थिरता कायम असे.

आपली इहलोकची वस्ती आटपत आली ही गोष्ट हरिभाऊंसारख्या चाणाक्ष माणसास, विशेषतः आपल्या कादंबऱ्यातून मृत्यूचे व त्यापूर्वीच्या स्थितीचे प्रसंग हुबेहुब डोळ्यांपुढें उभे करणाऱ्या त्यांच्यासारख्या कादंबरीकारास लोकांनी सांगावयास पाहिजे होती असें नाहीं. भेटीला येणारे जाणारे गृहस्थ तर त्यांना उलट धीरच देत होते. पण त्यांत काही तथ्य नव्हेत हें हरिभाऊ पूर्ण जाणून होते. तरी त्यांची शांति केव्हांही ढळली नाहीं. आप्तसंबंधी माणसें भोंवताली असत, त्याना निष्कारण भीति वाटूं नये किंवा तीं घाबरूं नयेत याबद्दलच उलट ते खबरदारी घेत ! समाचा-राला येणाऱ्या माणसांची सकाळपासून सायंकाळपर्यंत एकसारखी गर्दी उडून जात असे. कोणी कांही समाधानाच्या गोष्टी सांगत, कोणी काहीं उपाय सुचवीत, कोणी अमक्या ठिकाणीं या रोगावर हमखास उपाय होतो म्हणून सांगत, तर कोणी हरिभाऊंच्या स्थितीकडे पाहून सचिंत व स्तब्ध असे बसत. तरी हरि-भाऊंच्या मनाची स्थिरता कायमच असे !

## ग्रंथ हेच खरे आप्तेष्ट.

अशा प्रकारें सुमारें दीड दोन महिने त्यांनी मृत्युशय्येवर काढले. अशा प्रसंगींही जर कोणाच्या सांनिध्यानें त्यांना विशेष आनंद झाला असेल तर तो पुस्तकांच्या सांनिध्यानेंच होय. आसन्न स्थितीत असलेला मनुष्य आप्तइष्टांपैकींच मला अमक्याला भेटावयाचें, मला तमक्याला भेटावयाचें अशी इच्छा प्रदर्शित करून त्यांना पत्रें पाठवावयास किंवा तारा करावयास सांगतो. पण हरिभाऊंचे खरे आप्तइष्ट त्यांचे आवडते ग्रंथच होते. त्यांनाच ते आपल्या भेटीस प्रेमानें बोलवीत, आणि त्यांच्याच दर्शनांत सुख मानीत ! "प्राणव्यसनींही" त्यांचें हें विद्येचें व्यसन अखंड राहिलें हें पाहून समोर उभ्या असलेल्या मृत्यूसही विस्मय वाटल्यावाचून राहिला नसेल ! नवीन पुस्तकें आणून वाचण्यासारखी त्यांची स्थिति नव्हती. तरी पुस्तकें आणण्याचा त्यांचा लोभ अगदी अखेरपर्यंत सुटला नाहीं. एखाद्या पुस्तकाची पानेंच फाड, एखाद्यास पुष्टिपत्र घाल, एखाद्यावरून नुसताच हात फिरीव किंवा एखाद्यास प्रिय अपत्याप्रमाणें पोटाशी कवटाळून धर असा त्यांचा एकसारखा क्रम चाललेला असावयाचा ! आपल्या प्राणापेक्षाही प्रिय अशा आपल्या मुलाच्या तोंडावरून हात फिरविण्यात वत्सल पित्याला जें सुख वाटतें तेंच सुख पुस्तकावरून हात फिरविण्यात हरिभाऊंना वाटे !

रा. मेद्राळकर हे यासंबंधानें लिहितांना म्हणतातः—मीं एकदा त्यांना विचारलें, "तुम्हाला या पुस्तकाकडे नुसतें पहात बसण्यात काय मौज वाटते ?" तेव्हां ते प्रेमार्द्र स्वरानें म्हणाले, "मला हे जे शेंकडो व्यवहारी लोक भेटावयास येतात त्यांच्यामुळें जो त्रास होतो, तो या माझ्या आप्तांकडे पाहून पार नष्ट होतो. माझे हे अत्यंत जिवलग स्नेही आहेत. आणि सांप्रतच्या माझ्या स्थितींत यांचा नुसता सहवासही मला फार सुखाचा वाटतो !"

## मृत्युशय्येवरील वाग्विहार.

इकडे रोगावर उपाय चाललेच होते. दुखण्याला कधीं चढ व्हावा, कधीं उतार दिसावा, असा आशे-निराशेचा झगडा चालू होता. तरी हरिभाऊंची शांत वृत्ति मात्र अचल होती. अपूर्ण कादंबऱ्यांचीं अवशिष्ट कथानकें त्यांच्या एकसारखीं डोक्यात घोळत होती. ही आतां आपल्या हातून पूर्ण होणार नाहीत असें एकीकडे त्यांच्या मनास वाटून त्यांना अर्थातच दुःख होई ! अशाच स्थितीत त्यांनीं

जाईल रात्र, मग होइल ती सकाळ,
होऊन रव्युदय, पंकजही फुलेल;
ही आस भृंग धरि त्यांतचि कोंडलेला
हा ! हा ! तशांत उपडी गज पद्मिनीला !

हा श्लोक एके दिवशी केला. यावरून आपले मनोरथ जागच्या जागी ठेवून आपण जाणार, याबद्दल त्यांच्या मनात कोणताही संशय राहिला नव्हता असे स्पष्ट दिसून येतें. तरी सुद्धां समाचारास येणाऱ्या माणसांस हरिभाऊंना समाधानाच्या गोष्टी सांगण्याचा केव्हाही प्रसंग येत नसे. उलट हरिभाऊच 'माझें बरें आहे' म्हणून सांगून येणाऱ्या जाणाऱ्या अनेक माणसाशीं दुसऱ्याच गोष्टी बोलत. एके दिवशीं सकाळी त्यांचे एक स्नेही त्यांच्याजवळ बसले होते. हे आतां बराच वेळपर्यंत आपली चांगली करमणूक करतील, असें हरिभाऊंना वाटत होतें. इतक्यांत दुसरे एक गृहस्थ येऊन त्या मित्रास घेऊन गेले. ते गेल्यानंतर हरिभाऊंनी एक आर्या लिहून ठेवली. स्नेही आल्याने याची आपल्याला करमणूक होईल अशी आशा आपल्या मनांत उत्पन्न झाली इतक्यांत " आर्थरदर्शनलोलुप शंकर गेला गणूस घेऊन ", असें झाल्यामुळें आपणांस खिन्नता कशी आली हें त्यांनीं या आर्येंत वर्णन केलें होतें. मजबरोबर चला, म्हणून मृत्यु हातानें खुण करतो आहे अशा स्थितींत सुद्धां आपले विचार पद्यमय करण्याइतकी स्थिरता त्यांच्या ठिकाणीं दिसावी, यावरून सरस्वतीचे ते एकनिष्ठ भक्त होते हें जसें सिद्ध झालें तसेंच त्यांची मनःशांति एखाद्या विदेही माणसासही भूषणीभूत होण्यासारखी कशी होती हेंही उत्कृष्ट रीतीनें दृष्टोत्पत्तीस आलें !

अखेर ता. ३ मार्च स. १९१९ रोजी ते पुण्यास आले. येता येता गाडीतच त्यांची अत्यवस्थ स्थिति होऊन ते कसे बसे आनंदाश्रमांत येऊन पोहोंचले. दुपारची ऐन एक वाजण्याची वेळ ! प्रकृति अगदीं थकलेली आणि त्यांत उन्हाच्या वेळीं गाडीची दगदग झालेली! घरीं येऊन पोहोंचतात न पोहोंचतात तोंच त्यांच्या तोंडातून रक्ताच्या गुळण्या येऊं लागल्या. बरोबर डॉ. रेळे आले होते. त्यांनीं योग्य औषधोपचार करून त्याना थोडीशी स्वस्थता आणली, तरी गुळण्या चालूच होत्या. आतां आपण कांहीं तासांचेच सोबती आहोंत ही गोष्ट ध्यानांत आल्याबरोबर पुढील तीन चार तासांत आपल्या पत्नीसंबंधानें त्यांना जी काय व्यवस्था करावयाची होती ती त्यांनीं मोठ्या शांतपणानें केली !

## देहावसान !

ही त्याची शांत प्रकृति अगदी निधनकालापर्यंत कायम होती. डॉ. रेळे हे तिहींच्या एक्सप्रेसनें मुंबईस परत गेल्यावर डॉ. शिखरे, डॉ. व्ही. सी. गोखले, व डॉ. एन. एल. रानडे हे हरिभाऊंच्या शुश्रूषेकरितां अगदी अखेरपर्यंत होते, " या जगांत आतां आमचे किती तास उरले आहेत ? " असे त्यांनीं डॉ. शिखरे यांना विचारलें, तेव्हां 'तसें निश्चित करें सांगता येईल, कदाचित् आपण आणखाही काहीं दिवस जगाल.' असे त्यानी उत्तर दिलें. सर्व प्रेमपाश सोडून इहलोकचा अखेरचा निरोप घेण्याची वेळ संनिध आली असतांही हरिभाऊंनी दाखविलेली ही शांति पाहून डॉ. शिखरे यांनाही त्याच्याबद्दल विशेष आदर वाटला. व तो बाहेर येऊन त्यानी आपल्या व्यवसायबंधूजवळ व्यक्तही केला; आणि त्यानंतर एक तासानें हरिभाऊंचे देहावसान झालें ! घरांत प्रवेश केल्यापासून सहाच तासात ते आपल्या परिवारास दुःखात सोडून परलोकीं गेले !

" सर्व इष्टानिष्ट व्यापार करणारा आत्मा आत कायम आहे तोंपर्यंत कोणाचीही माती कोणालाही जड नाही; परंतु एकदा का पिंजऱ्याचें दार उघडून फरारी होणाऱ्या सुंदर पाखराप्रमाणें तो आत्मा अदृश्य झाला म्हणजे मग तें शरीर आईचें असो, बापाचें असो, भावाचे असो, बायकोचें असो किंवा आणखी कोणाचें असो, तें दोन तासमुद्धा दृष्टीसमोर ठेवणें मोठ दुःसह होते." या त्यानीच वर्णिलेल्या वस्तुस्थितीप्रमाणे त्याच्याही स्थूल देहाची व्यवस्था लागली !

तरुण पिढीला अनेक प्रकारे बोधक आणि मार्गदर्शक अशा हरिभाऊंच्या वैचित्र्यमय चारित्र्याची ही केवळ रूपरेखा दर्शविली आहे. हरिभाऊंच्या आयुष्यक्रमांतील विशेष गुण म्हटला म्हणजे त्यांचा जबर विद्याव्यासंग हा होय. विद्वत्तेसंबंधानें त्याचा एवढा मोठा अधिकार असताहि त्यानी आपली विनयशीलता केव्हांही सोडली नाही. त्यांच्या विनयशील वृत्तीचें थोडक्यांत वर्णन द्यावयाचें म्हणजे त्यांचा सहवास करतांना थोर व्यक्तींना ठेंगणें होण्याचें कारण नसे, व लहान माणसांना उंच व्हावें लागत नसे. स्वतःची जाहिरात देणें हें त्यांच्या स्वभावाला कधींहि आवडत नसे. प्रेमळपणा हा त्यांच्या अंगच्या सर्व गुणांचा कंठमणिच होय. या त्याच्या गुणामुळे ते सहस्रावधि लोकांचें विश्रामस्थान बनले होते. हरिभाऊ हा समास सोडवावयास सांगितलें तर तो कर्मधारयाप्रमाणेंच सोडवावा लागेल ! त्यांच्याशीं सहवास घडण्याचा सुयोग आलेल्या माणसांना ते आपल्या

मावाप्रमाणेंच वाटत. त्यांनीं आपल्या सुस्वभावानें, प्रेमळपणानें, शांतवृत्तीनें व प्रभावशील लेखनसामर्थ्यानें हजारों माणसांचीं मनें आपल्याकडे आकर्षून घेतली होतीं. तरुण पिढीला त्यांचा आयुष्यक्रम आदर्शवत् होऊन त्यांच्यामध्यें वर सांगितलेल्या गुणाचें बीजारोपण होवो व हरिभाऊंचे प्रतिभासंपन्न ग्रंथ त्यांच्यांमध्यें लेखनव्यवसायाबद्दल स्फूर्ति उत्पन्न करोत! "मृत्यु येऊन व्यक्तीचें शरीर पतन पावते. त्याचा आत्मा आणि त्या आत्म्याचे उन्नत विचार बरोबरच जातील. कधीं त्यापासून अंतराने होणार नाहीं" याच न्यायानें, हरिभाऊंनीं आपल्या प्रतिभासामर्थ्यानें ज्या विचारांचें बीजारोपण केलें आहे, त्या विचारांचा एकसारखा विकास होत जाऊन ते पूर्णतेच्या मार्गाप्रत जावोत।

समाप्त.

# कै. हरि नारायण आपटे यांनीं लिहिलेले ग्रंथ.

| ऐतिहासिक कादंबऱ्या. | | किं० रु० आ० पै. |
|---|---|---|
| १. उषःकाल. ... ... | ( नं. १ )... ... | २—८—० |
| २. गड आला पण सिंह गेला. | ( नं. २ ) ... ... | ०—८—० |
| ३. रूपनगरची राजकन्या | ( नं. ३ ) ... ... | २—०—० |
| ४. चंद्रगुप्त ... ... ... | ( नं. ४ ) ... ... | १—८—० |
| ५. वज्राघात. ... ... ... | ( नं. ५ ) ... ... | २—४—० |
| ६. सूर्योदय ... ... ... | ( नं. ६ ) ... ... | २—४—० |
| ७. केवळ स्वराज्यासाठीं ! | ( नं. ७ ) ... ... | २—४—० |
| ८. सूर्यग्रहण ( नं. ८ ) ... ... ... ... | | २—४—० |

### सामाजिक कादंबऱ्या.

| | | |
|---|---|---|
| १. आजकालच्या गोष्टी [ मधली स्थिति ] | ( नं. १ ) | २—०—० |
| २. पण लक्ष्यांत कोण घेतो ! ... | ( नं. २ ) ... | २—८—० |
| ३. मी. ... ... ... ... ... | ( नं. ६ ) ... | २—८—० |
| ४. यशवंतराव खरे ... ... ... | ( नं. ७ ) ... | १—८—० |
| ५. गणपतराव (अपूर्ण) ... ... | ( नं. ९ ) ... | १—४—० |

### नाटकें व प्रहसनें.

| | |
|---|---|
| १. संगीत संत सखूबाई. ... ... ... ... | १—०—० |
| २. संगीत पिंगला नाटक. ... ... ... ... | १—०—० |
| ३. भासकवीच्या नाटककथा ... ... ... | ०-१२—० |

### गोष्टी.

| | |
|---|---|
| १. स्फुट गोष्टी, भाग १, २, ३, ४. प्रत्येकीं ... | ०—८—० |
| २. कसे दिवस गेले ! ! ( प्लेगच्या कहरांतील एक गोष्ट ) | ०—२—० |

खालील पुस्तकें संपलेलीं आहेत. लवकरच छापून तयार होतील.

१. भयंकर दिव्य ! ( नं. ३ ) २. जग हें असें आहे ! ( नं. ४ )
३ मायेचा बाजार. ( नं. ५ ) चाणाक्षपणा वा कळस. ( नं. ८ ).

ता. १।३।१९२२. मॅनेजर, आर्यभूषण प्रेस, पुणें सिटी.

# संग्राह्य व वाचनीय पुस्तकें.

१ सार्थवाग्भट डॉक्टर गर्देकृत रु. आ. पै मुळ श्लोक, भाषांतर, टीपा व सूची यांसह. ... — १०–०–०

२ भारतीय ज्योतिःशास्त्र अथवा भारतीय ज्योतिषाचा इतिहास (शं. बा. दीक्षित.) ३–४–०

३ सरदार परशरामभाऊ पटवर्धन यांचे चरित्र व पेशवाईतील धामधुमीचा देखावा. ०–१२–०

४ विलायतचा प्रवास भाग दुसरा (रा. म. पावगीकृत.) १–०–०

५ पानिपतचा दुर्दैवी मोहरा. १–०–०

६ कुवलयपुरची राणी कुमुद्वती १–०–०

७ जर्मनीतील लोकशिक्षण ०–१२–०

८ वधूवरपत्रिकासंमेलन आणि कोंकणस्थ व कऱ्हाडे यांची गोत्रावळी. ... ०–४–०

९ ना. गो. कृ. गोखले चरित्र ०–४–०

१० राष्ट्रीयसभा व तिची वाढ अध्यक्षांचे तीस फोटोंसह. ०–८–०

१ श्रीतुकाराममहाराज यांचा सांप्रदायिक गाथा... ... ३–०–०

२ एकनाथी भागवत ... ... १–८–०

३ जैमिनीअश्वमेध ... ... १–०–०

४ पांडवप्रताप ... ... ... १–०–०

५ रामविजय ... ... ... ०–१२–०

६ भक्तिविजय ... ... ०–१२–०

७ हरिविजय ... ... ... ०–१०–०

८ दासबोध मोठा ... ... १–०–०

९ दासबोध मध्यम ... ... ०–८–०

१० दासबोध गुटका (कापडी) १–४–०

११ गुरुचरित्र मोठें ... ... १–४–०

१२ श्रीगुरुचरित्र धाकटें ... ०–१२–०

१३ श्रीगुरुचरित्र रे० गुटका १–०–०

१४ संतलीलामृत ... ... ... ०–८–०

१५ शिवलीलामृत... ... ... ०–६–०

१६ रुक्मिणीस्वयंवर ... ... ०–६–०

१७ श्रीमद्भगवद्गीता ... ... ०–२–०

१८ त्रिकालसंध्या ऋग्वेदी ... ०–०–६

१९ त्रिकालसंध्या हिरण्यकेशी. ०–०–६

२० श्रीतुकाराम चरित्र ... ०–१२–०

२१ त्रिसुपर्ण सार्थ ... ... ०–३–०

ही पुस्तकें पुणें व मुंबई येथील सर्व बुकसेलर्सकडे मिळतील.

मॅनेजर—आर्यभूषण प्रेस, पुणें.